साने गुरुजींच्या गोड गोष्टी : ७

# बेबी सरोजा





करी मनोरंजन जो मुलांचे । जडेल नाते प्रभुशी तयाचे ।।

सानेगुरुजींच्या गोड गोष्टी सानेगुरुजींच्या गोड गोष्टी सानेगुरुजींच्या गोड गोष्टी

''करी मनोरंजन जो मुलांचे।
जडेल नाते प्रभुशी तयाचे॥''

गोड गोष्टी : भाग सातवा

# बेबी सरोजा

: लेखक :

सानेगुरुजी, एम्. ए.

सानेगुरुजींच्या गोड गोष्टी सानेगुरुजींच्या गोड गोष्टी सानेगुरुजींच्या गोड गोष्टी



केशव भिकाजी ढवळे संस्था शताब्दी वर्ष गणेशचतुर्थी १९०० ते २०००

पहिली आवृत्ती १९४१,
सव्वीसावी आवृत्ती १९९१
पुनर्मुद्रणे १९९२, १९९३, १९९४
१९९६, १९९८
बत्तिसावे पुनर्मुद्रण १९९९

टाईपसेटिंग
अक्षय फोटो टाइपसेटर्स
१- चित्रकूट
डॉ. आंबेडकर मार्ग, ठाणे ४०० ६०१

मुद्रक
जस्मिन आर्टस्
सदाशिव गणेश परूळकर
वडाळा उद्योग भवन
वडाळा, मुंबई ४०० ०३१

प्रकाशक
ज्योती धनंजय ढवळे
केशव भिकाजी ढवळे
पहिली भटवाडी, गिरगाव,
मुंबई ४०० ००४

# त्यागातून दलितांचा उद्धार

जेलमध्ये एक तामिळी मित्र भेटला.
त्याला एक महिन्याचीच सजा होती.
तो दु:खी असे.
त्याची माझी मैत्री झाली.
मी त्याच्याजवळ बोलत असे.
तामीळ भाषेतील गोष्टी सांगा असे मी त्याला म्हणे.
तामीळ भाषेतील प्रख्यात कादंबऱ्यांतील काही गोष्टी
सारांशरूपाने त्याने मला सांगितल्या.
त्या गोष्टींपैकी 'बेबी सरोजा' ही आहे.
तामीळ भाषेतील ह्या नावाची कादंबरी फार प्रख्यात आहे
व बेबी सरोजाचा तामीळमध्ये बोलपटही आहे असे तो मला म्हणाला.
तो बोलपट मला पाहायला मिळाला असता तर किती छान झाले असते!
परंतु तो पाहाता येईल तेव्हा येईल.
सध्या तर ही गोष्ट मी महाराष्ट्रांतील मुलांना देत आहे.
बेबी सरोजाशिवाय इतर नावें मी स्वतंत्र वापरली आहेत.
माझ्या मित्राने सांगितलेली गोष्ट आठवून,
तीत फेरफार करून, थोडीफार भर घालूनही देत आहे.
कथेचा धागा मित्राने सांगितलेला.
विस्तार माझा.
त्या माझ्या तामीळ मित्रास अनेक प्रणाम.
त्याने सांगितलेल्या इतर गोष्टी आठवल्या
तर त्याही देईन.
परंतु पुढे.

**साने गुरुजी**

भाग सातवा : बेबी सरोजा

# अनुक्रमणिका



बेबी सरोजा : प्रकरण पहिले

# रामराव



त्या गावाचे नाव शिवतर असे होते. फार सनातनी व सोवळे गाव. शिवतर शब्दाचा अर्थ कल्याणकारक; परंतु ज्या गावात शिवाशिवी हाच धर्म, त्या गावात कल्याण कोठून येणार? शिवतर गावात सदैव भांडणे, रोज कटकटी व मारामाऱ्या, पोलिसांना हे गाव फार आवडे, वकिलांना फार आवडे, गावगुंडांना फार आवडे.

हा कोणाचा मोठा वाडा? हा वाडा रामरावांचा. श्रीमंत आहेत वाटते? जमीनदार आहेत वाटते? वाड्यावरून तसे वाटले, तरी रामराव फार श्रीमंत नाहीत. गरिबी आता त्यांना आली आहे, परंतु पूर्वीचा मोठा वाडा अद्याप उभा आहे. पूर्वीचे मोठे नाव अद्याप ऐकू येते.

रामरावांना एक मुलगी होती. तिचे नाव प्रेमा. प्रेमाला बरोबर घेऊन ते शेतावर जात, तिला बरोबर घेऊन फिरायला जात. प्रेमाशिवाय त्यांना चैन पडत नसे.

त्या प्रचंड वाड्यात फार माणसे नव्हती. रामराव, त्यांची पत्नी सगुणाबाई व ही मुलगी प्रेमा. एखादूदुसरा गडी असे. तो प्रचंड वाडा त्यांना खायला येई. साऱ्या वाड्याचा केर काढणेही कठीण. मुख्य दिवाणखान्यात बैठक होती. काही हंड्या होत्या. काही मोठी चित्रे होती; परंतु त्या दिवाणखान्यात रामराव फारसे बसत नसत.

रामरावांना गरिबांची आस्था असे. ते दुसऱ्याला मदत करायला सदैव तयार असत. एकदा एका शेतकऱ्याची गाडी चिखलात फसली. रामराव जात होते.

त्यांनी चिखलात उतरून गाडी वर काढायला मदत केली. त्यांचा तो स्वभावच होता.

त्यांची एक मोठी आंबराई होती; परंतु रामराव आंबे कधी विकीत नसत. शेतकऱ्यांना, हरिजनांना, गोरगरिबांना ते वाटीत. गावच्या शाळेतील मुलांना वाटीत. कधी सर्व गावाला आंबरसाचे जेवण देत.

त्यांना भजनाचा नाद असे. भजन कोठेही असो, ते जायचे. त्यांना त्यात कमीपणा वाटत नसे. परमेश्वराचे नाव कोठेही ऐकावे. देवासमोर कोठेही लवावे असे ते म्हणत. त्यांनी प्रेमाला कितीतरी अभंग, गाणी शिकविली होती. प्रेमाला ते पहाटे उठवायचे व मांडीजवळ घेऊन तिला शिकवायचे. प्रेमाही गोड आवाजात म्हणायची.

'आपण एकदा यात्रेला जाऊं.' सगुणाबाई एके दिवशी म्हणाल्या.

'इतक्यांत नको.' रामराव म्हणाले.

'मग कधी जायचे ? परतीची स्वस्त तिकिटे निघाली आहेत म्हणे. आपल्या गावची पुष्कळ मंडळी जाणार आहेत. आपणही जावे.'

'आपण जाऊ कधी तरी; परंतु अशा घाईत नको. आपली प्रेमा मोठी होऊन, तिचे लग्न होऊन ती एकदा सासरी गेली, म्हणजे मग आपण यात्रेला जाऊ. संसाराची यात्रा संपत आली की, देवाच्या यात्रेस निघावे. नाही तर यात्रा करून यायचे आणि पुन्हा मायामोहात पडायचे, ते बरे नाही.'

'कधी करणार प्रेमाचे लग्न ?'

'घाई काय आहे ? जरा होऊ दे मोठी. लहान वयात नको संसार अंगावर. आज कोठे गेली आहे प्रेमा ? दिसत नाही मघापासून ?'

'गेली असेल मैत्रिणींकडे.'

'त्या शंभुनानांकडे नाही ना गेली ?'

'का बरे ?'

'शंभुनानांकडे प्रेमा न गेलेली बरी. त्यांचा मुलगा आहे ना, त्याच्याविषयी लोक नाना गोष्टी सांगतात.'

'लोकांना त्यांच्या श्रीमंतीचा मत्सर वाटतो. श्रीमंत म्हटला, म्हणजे दुर्गुणी व व्यसनी असायचाच असे भिकाऱ्यांना वाटते. उगीच कंड्या उठवतात.'

'परंतु प्रेमाने तिकडे जाऊ नये असे मला वाटते.'

'शंभुनाना तर प्रेमाला सून करून घेऊ असे थट्टेने म्हणत असतात.'

'प्रेमा मी एखाद्या दरिद्र्याला देईन परंतु शंभुनानांकडे देणार नाही. काय चाटायची ती श्रीमंती!'

असे म्हणून रामराव उठून दिवाणखान्यात गेले. तो प्रेमा तेथे होती.

'काय ग प्रेमा, तू बाहेर ना गेली होतीस?'

'नाही. मी इथेच होते.'

'एवढ्या दिवाणखान्यात एकटीच बसली होतीस? तुला भीती नाही वाटत?'

'बाबा, आपला दिवाणखाना रिकामा असतो आणि महारांच्या मुलांना शाळा नाही. आपल्या दिवाणखान्यात त्यांची शाळा भरली म्हणून काय झाले? मग दिवाणखान्याची भीती वाटणार नाही. भरलेला राहील.'

'प्रेमा, आपल्यावर लोक बहिष्कार घालतील.'

'परंतु महार आपल्या बाजूला येतील.'

'घाई करून चालणार नाही. हळुहळू सुधारणा होईल.'

'बाबा, तुमच्या त्या विवेकानंदांच्या पत्रांत त्यांनी किती जळजळीत लिहिले आहे. विवेकानंदांना का धर्म कळत नाही? आणि गावातल्या ह्या शिष्टांना का कळतो?'

'प्रेमा, तू लहान आहेस.'

'मी नाही लहान. चौदा वर्षांची झाल्ये तरी का लहान?'

'मग करून टाकू लग्न?'

'लग्नाला अद्याप मी लहान आहे.'

'अग, आठव्या वर्षी लग्न करावे.'

'परंतु मोतीलाल नेहरू म्हणाले, विसाव्या वर्षी करावे.'

'कोठे ग वाचलेस!'

'त्यांचे भाषण झाले होते. नवाकाळात आले होते. मी नव्हते का वाचून दाखविले? आईसुद्धा होती ऐकायला. आई म्हणाली, 'इश्श.' माझ्या सारे लक्षात आहे.'

'लग्नाच्या गोष्टी मुलींच्या ध्यानात राहाणारच.'

'बाबा, माझे लग्नच करू नका. मला खूप शिकवा. मी गरिबांची सेवा करीन. डॉक्टरीण होईन. दवाखाना काढीन. आपल्या ह्या वाड्यात दवाखाना

काढता येईल. गरीब आजारी लोकांना ठेवता येईल. मिशनरी बाया हजारो मैलांवरून येतात, दवाखाने घालतात आणि आम्ही आमच्या देशासाठी काहीच नये का करू?'

'प्रेमा, सर्वांनाच ह्या गोष्टी साधत नाहीत.'

'मला साधतील. माझ्या मनात काय काय तरी येत असते. कोणाला ते सांगू?'

'तू येतेस ना शेतावर? चल.'

'मी नाही येत.'

'का?'

'शेतावर काम करणारे महार दूर बसतात. ताई दूर व्हा, दूर व्हा, मला म्हणतात आणि तुम्हीसुद्धा मला तिकडे जाऊ नकोस असे सांगता. मला नाही असे आवडत. बिचारे काम करतात आणि पुन्हा आपले दूर.'

'आपण फिरायला जाऊ चल. शेतावर नकोच.'

'चला. तुमची काठी आणू? चला.'

प्रेमा व रामराव फिरायला गेली. सगुणाबाई देवदर्शनाला गेल्या.





बेबी सरोजा : प्रकरण दुसरे

# सत्यनारायण



महारवाड्यात विठनाक म्हणून एक महार होता. त्याचा मुलगा येसनाक पलटणीत होता. तो रजेवर आला. मुलगा घरी आला म्हणून विठनाकाला फार आनंद झाला होता. महारवाड्यातील लहान थोर मंडळी येसनाकाला भेटायला येत होती.

विठनाकाने सत्यनारायण करायचे ठरविले. पांडूभटजी येऊन प्रसाद करणार होते. पूजा सांगणार होते. विठनाकाने अंगणात पूजेची तयारी केली. येसनाक पूजा करणार होता, हजार तुळशीपत्रे वाहाणार होता. सारा महारवाडा येणार होता.

परंतु तिसऱ्या प्रहरी आकाश भरून आले. अपरंपार पाऊस येणार असे वाटले. आता पूजा कशी होणार? अंगणात पाणी पाणी होईल. लोक कोठे बसणार, भजन कोठे करणार? सारीच पंचाईत.

'बाबा, रामरावांच्या घरी आपण जागा मागू. केवढे थोरले घर आहे. एका पडवीत पूजा मांडू, तेथे भजन करू.' येसनाक म्हणाला.

'नाही रे बाबा. सारे बामण धावून येतील.'

'येऊ देत धावून. मी रामरावांना विचारून तर पाहातो.'

'पोरा, असे अकृत करू नको. तू जाशील पलटणीत निघून, परंतु आम्हाला येथेच दिवस काढायचे.'

'बाबा, असे मागे मागे राहून कसे चालेल? आपण धिटाईने पुढे आले पाहिजे. आम्ही अस्पृश्य नाही असे पुकारले पाहिजे. आपणच स्वतःला अस्पृश्य

का म्हणावे? इंग्रज हिंदी लोकांना नालायक म्हणतात, म्हणून का हिंदी लोकांनीही स्वतःला नालायक समजावे? तसेच हे.'

'तू शहाणा झालास आता. कर तुला योग्य वाटेल ते.'

येसनाक रामरावांच्या घरी जायला निघाला तो त्याला शेतातच ते दिसले. बरोबर प्रेमळ प्रेमाही होती.

'रामराम.' येसनाक म्हणाला.

'रामराम, बरा आहेस ना रे. तू पलटणवाला आहेस. चाकरमान्या तू.' रामराव म्हणाले.

'दादा, तुम्हाला एक विचारायला आलो आहे.'

'काय रे?'

'आज बाबा करणार होते सत्यनारायण; परंतु वर आभाळात देव भरून आला आहे. तुमच्या वाड्यात द्याल जागा पूजेला?'

'हो, हो. आमच्या वाड्यात या. दिवाणखान्यात पूजा मांडू. मी परवाच झाडून ठेवला आहे. हंड्यांतून मेणबत्त्या लावू. मजा होईल नाही, बाबा?'

'दादा, सांगा ना.'

'हे बघ येश्या, आमच्याकडे तुमचा सत्यनारायण केलात, तर भटजी पूजा सांगायला येणार नाहीत.'

'मी सांगेन पूजा. मराठी तर असते. ये रे येसनाका. मी पूजा सांगितली तर का चालणार नाही? मी वाचीन, नाही तर बाबा वाचतील.'

'मी भटजींना जाऊन विचारतो. न आले तर तुम्हीच सांगा पूजा, तुम्हीच कथा वाचा.'

'आणि तुम्ही भजन करा. मी पेटी वाजवीन. मीसुद्धा अभंग म्हणेन. रात्री कॉफी करू. आज मजा, आनंद. नाही बाबा?'

'परंतु सनातनी लोक रडवतील मागून.' रामराव गंभीरपणे म्हणाले.

'परंतु सत्यनारायण हसवील! सत्यनारायणापेक्षा का ह्या रूढीवाल्यांची शक्ती अधिक आहे?' येसनाक म्हणाला.

येसनाक गावात गेला. त्याने पांडूभटजींस विचारले.

'ह्या भ्रष्टाकारात मी सामील होणार नाही. सत्यनारायण उद्या करा. आजच का अडले आहे?'

'मनात येताच पूजा करावी. उद्याचा काय भरवसा? शिवाय उद्या मला परत गेले पाहिजे. रजा संपते. सांगा. याल ना?'

'नाही, मी येणार नाही. हे पाप करू नका. तो रामराव जागा देऊन अधर्म करायला तयार झाला तरी तुम्ही अधर्म करू नका.'

'मला धर्म अधर्म समजतो.'

'मग भटजीकडे कशाला आलास? पलटणीत धर्म शिकवतात वाटते?'

'माणुसकीचा धर्म शिकवावा लागत नाही. खोटे धर्म शिकवावे लागतात. बरे बसा. मी जातो.'

येसनाक रामरावांना सांगायला पुन्हा शेतावर आला. प्रेमा फुले तोडीत होती.

'ही बघ गुलाबाची फुले. ही शेवंतीची. येणार का भटजी?' प्रेमाने विचारले.

'नाही येणार.'

'मग आज बाबा भटजी होतील. ते पूजा सांगतील व मी कथा वाचीन.'

'वा. छान!'

'ठरले ना बाबा? हो ठरलेच. जा रे येसनाक. साऱ्यांना बोलाव.'

रामराव बोलत नव्हते. प्रेमाने फुलांची परडी भरून घेतली. तिने पित्याचा हात धरला. दोघे घरी आली.

'आई, आपल्याकडे आज सत्यनारायण आहे; भरपूर प्रसाद कर.'

'कसला सत्यनारायण?'

'तुझ्या प्रेमाच्या लग्नाचा.'

'चावट आहेस. नीट बोल.'

प्रेमाने सारी हकीगत सांगितली.

'प्रेमा, आपल्यावर बहिष्कार पडेल.'

'परंतु देवाची कृपा होईल.'

इतक्यात रामरावही आले. प्रेमा पळाली. ती दिवाणखान्यात तयारी करू लागली. रामरावांनी सगुणाबाईंची समजूत घातली. त्या तयार झाल्या. विठनाक व येसनाक आले. त्यांनी साखर, तूप, रवा, केळी वगैरे सामान आणून दिले.

'अरे सामान कशाला?' रामराव म्हणाले.

'वा:, आमचा सत्यनारायण. तुमचे सारे घेऊन कसे चालेल?' विठनाक म्हणाला.

'बरे हो.' ते म्हणाले.

सगुणाबाईंनी भरपूर प्रसाद केला. दिवाणखान्यात पूजा सुरू झाली. येसनाक पाटावर बसला होता. रामराव पूजा सांगत होते. उदबत्त्यांचा घमघमाट सुटला होता. महारवाड्यातील स्त्रीपुरुष, मुले सारी मंडळी आली होती. अपूर्व प्रसंग! सर्वांची तोंडे फुलली होती.

आणि खरोखरच प्रेमाने पोथी वाचली. भक्तिप्रेमाने तिने वाचली, भक्तिप्रेमाने सर्वांनी ऐकली. आरती झाली. सर्वांना प्रसाद वाटण्यात आला. सगुणाबाईंनी सर्व बायकांना हळदकुंकू दिले.

बाहेर पाऊस सुरू झाला. धो धो पडत होता; परंतु आत मंगल भजन चालले होते. प्रेमा पेटी वाजवीत होती. भजनात सारी मंडळी रंगली. रामरावांनीही दोन अभंग म्हटले.



मध्यरात्री सर्वांना कॉफी देण्यात आली. नंतर पुन्हा भजनाचा गजर सुरू झाला. पहाटेपर्यंत भजनानंद चालला होता. आता पाऊस थांबला होता. आकाश निरभ्र झाले होते. सारी अस्पृश्य मंडळी परत गेली. रामरावांना धन्यवाद देत गेली.

येसनाक परत पलटणीत गेला; परंतु इकडे महारांवर सनातनी मंडळींनी बहिष्कार पुकारला. रामरावांवरही बहिष्कार. महारांस कोणी शेत मक्त्याने देईना. त्यांची मोळी कोणी विकत घेईना. त्यांची वरंड घेईना. त्यांना कामाला कोणी बोलवीना. दुकानदार माल देत ना. जीवनाची कोंडी झाली. उपासमार सुरू झाली. सनातनी मंडळींच्या हाती साऱ्या आर्थिक नाड्या. त्यांनी त्या आवळल्या. शेवटी महार शरण गेले. त्यांनी माफीपत्र लिहून दिले. तेव्हा त्यांच्यावरचा बहिष्कार उठवण्यात आला.

परंतु रामराव शरण येत ना. ते आर्थिक दृष्ट्या तितके पंगू नव्हते. त्यांना गडी माणूस मिळेना. त्यांचे शेतकाम कोणी करीना. तरीही ते टिकाव धरून राहिले. 'तुम्हाला गावातून जायला भाग पाडू, तरच आम्ही खरे धार्मिक.' असे सनातनी धमकीने सांगत.





बेबी सरोजा : प्रकरण तिसरे

# प्रेमाचे लग्न



'काहीतरी करून पोरीचे एकदा लग्न लावा. ती एकदा सासरी गेली म्हणजे हे डोळे मिटीन. घरांतून बाहेर पडता येत नाही. कोणीकडे जाता येत नाही. तुमचा मानी स्वभाव आडवा येतो. माफी मागा व मोकळे व्हा. परंतु ते नाही.'

'अग, आपली काही चूक असेल तर ना माफी मागायची? पातक्यांची माफी मागणे म्हणंजे सर्वांत मोठे पाप. मेलो तरी मी माफी मागणार नाही.'

'परंतु प्रेमाचे कल्याण व्हावे असे नाही का तुम्हाला वाटत? तुम्ही आम्ही जाऊ; परंतु तिला जगात जगायचे आहे.'

'मी तिच्यासाठी खटपट का करीत नाही? सतरा ठिकाणी धोंडे मारून पाहात आहे. कोठेतरी धोंडा लागेल. मी सांगू का, ह्या शेवटी नेमानेमाच्या गोष्टी असतात; परंतु प्रयत्न करू नये असे नाही. जेथे जेथे मी जातो, तेथे तेथे हे सनातनी गुंड मोडता घालतात. लग्न मोडणे ह्यासारखे पाप नाही...'

इतक्यात प्रेमा आली.

'बाबा, तुम्ही सचिंत का? आई, तू का अशी?'

'तुझ्यासाठी चिंता.' सगुणाबाई म्हणाल्या.

'माझी चिंता देवाला आहे. सत्यनारायणाला आहे. बाबा माझ्या लग्नाची एवढी का यातायात? नाही झाले लग्न म्हणून काय बिघडले?'

'प्रेमा, तू लग्न केलेच पाहिजेस. तू लग्न करणार नसशील तर मी जीव देईन. अब्रूचे धिंडवडे चालले आहेत तेवढे पुरेत. तुम्ही मुली लग्न नको नको

म्हणता व उद्या दुसऱ्याच गोष्टी कानांवर येतात. ते काही नाही, तू लग्न करणार की नाही बोल. आता सांग.'

'आई, माझ्यावरचा तुझा विश्वास का अजिबात गेला?'

'वयात आलेल्या माणसाचा विश्वास धरू नये. दुथडी भरून जाणाऱ्या नदीला नीट अडवून ठेवणेच बरे. नाही तर सर्वनाश व्हावयाचा.'

'आई, द्या हो मला वाटेल तेथे. करा एकदा लग्न व कृतार्थ व्हा. मग पस्तावू नका म्हणजे झाले.' असे म्हणून प्रेमा वर गच्चीत जाऊन बसली. ती खिन्न झाली होती. दुःखी झाली होती.

रामराव पुन्हा वरशोधार्थ निघाले.

एके दिवशी शंभुनानांचा मुलगा तात्या अकस्मात् रामरावांच्या घरी आला.

'प्रेमा, आई कोठे आहे?'

'थांबा हां, बोलावत्ये.'

प्रेमाने आईला बोलावून आणले. सगुणाबाई आल्या.

'प्रेमाच्या आई, तुम्हाला एक गोष्ट सांगायला आलो आहे.'

'कोणती गोष्ट? आणि तुम्ही आमच्याकडे कशाला आलेत? तुमच्यावरही बहिष्कार पडायचा.'

'आम्ही अद्याप गरीब झालो नाही. गरिबांवर बहिष्कार पडतात. जेथे लक्ष्मी आहे, तेथे अधर्म कसा राहील? तेथे धर्म असलाच पाहिजे. बहिष्काराची आम्हाला भीती नाही आणि तुमच्यावरचाही बहिष्कार उठण्याचा एक उपाय सांगायला मी आलो आहे; सांगू?'

'कोणता उपाय? शक्य आहे का?'

'शक्य आहे, सहज शक्य आहे.'

'सांगा तर.'

'तुमची प्रेमा मला द्या. माझे बाबा तिला सून म्हणून करून घ्यायला तयार आहेत. ते ग्रामस्थांचे मन वळवून बहिष्कारही उठवतील.'

प्रेमा तेथून निघून गेली.

'प्रेमा, थांब; जाऊ नकोस.'

'जाऊ दे. लग्नाच्या गोष्टी निघाल्या की ती लाजते.'

'तुमच्या प्रेमावर माझे प्रेम आहे. आमचा विवाह होऊ दे. तुमचा बहिष्कार उठू दे. तुम्हाला सुख व आम्हाला सुख.'

'परंतु प्रेमाचे काय?'

'ती आमच्याकडे खेळायला येत असे. तिचेही माझ्यावर प्रेम असेल आणि नसले तर पुढे बसेल. बायकांचे शेवटी ज्यांच्याशी लग्न लागते त्यांवर प्रेम जडते. पाहा बोवा, बाबांच्या संमतीने मी आलो आहे.' असे म्हणून तात्या गेला.

तो गेल्यावर सगुणाबाई म्हणाल्या, 'किती धिट्ट तरी हा तात्या.'

रामराव घरी परत आले. ते थकले होते. कोठे काही जमले नव्हते. सगुणाबाईंनी तो तात्याचा उपाय सांगितला. रामराव चिडले. संतापले. तात्याच्या कानांवर त्या वार्ता गेल्या. शंभुनाना व तात्या ह्यांनीही प्रेमाचे लग्न नाहीच कोठे ठरू द्यायचे अशी प्रतिज्ञा केली. त्यांचे विषप्रसारक दूत सर्वत्र हिंडत असत.

रामरावांनी आता दूर दूर जायचे ठरविले. सगुणाबाई व प्रेमा ह्यांना घेऊन ते एके दिवशी रात्री गुपचूप घराबाहेर पडले. ते मुंबईस आले. तेथून नागपूरला आले. प्रेमा व सगुणाबाई ह्यांना तेथे एके ठिकाणी ठेवून ते इंदूर, उज्जयिनी, मह्, दिल्ली सर्वत्र संचार करीत गेले.

एके ठिकाणी एक स्थळ मिळाले. तो एका मोठ्या अंमलदाराचा मुलगा होता. मुलालाही लवकरच मोठी नोकरी मिळायची होती. साहेबलोकांत पितापुत्रांची जानपछान होती.

'मग आमची प्रेमा तुम्हाला पसंत आहे ना? फोटो तर पाहिलातच!' रामरावांनी विचारले.

'परंतु हुंड्याचे कुठे ठरले?' सदानंदपंत म्हणाले.

'किती पाहिजे हुंडा?'

'पाच हजार तरी हवा.'

'हे पाहा, मी पाच हजार हुंडा देतो. परंतु पुन्हा मात्र माझ्याजवळ काही मागू नका. घरदार सारे विकून मी पाच हजारांची भरपाई करतो.'

'ठीक तर. ठरवून टाकू या.'

'कुठे करायचे लग्न?'

'नागपूरला घेऊ उरकून.'

रामराव नागपूरला परत आले. त्यांनी सर्व हकीगत सांगितली. प्रेमा व सगुणाबाई ह्यांना तेथेच ठेवून ते शिवतरला आले. त्यांनी आपले एक उत्कृष्ट शेत विकायला काढले; परंतु कोण घेणार शेत?

'शेत कोणी घेऊच नका.' सनातनी म्हणू लागले.

'परंतु आपण न घेऊ, तर आफ्रिकेतून व्यापार करून पैसे आणणारे मुसलमान घेतील. सर्वत्र त्यांच्या जमिनी होऊ लागल्या. बहिष्कार असला म्हणून जमीन घ्यायला काय हरकत आहे?' शंभुनाना म्हणाले.

'बरोबर, बरोबर. शंभुनाना, ते शेत तुम्हीच घ्या. वाटेल ती किंमत पडो. घ्याच.'

मुसलमानांपेक्षा अधिक किंमत देऊन शंभुनानांनी ते शेत घेतले. पैसे घेऊन रामराव नागपूरला आले. त्यांनी पाच हजार हुंडा मोजून दिला. जावयाला पोषाख दिला. अंगठी दिली. थाटाने लग्न झाले.

प्रेमा आज सासरी जाणार होती. कोणास माहीत, सासरची माणसे कशी आहेत ती. पैशाची आशक दिसत होती. प्रेमाचा पती एखाद्या साहेबाच्या मुलासारखा दिसे. गोरागोरा लालबुंद होता; परंतु त्याची मुद्रा पाहून प्रसन्न वाटत नसे. त्याचे हसणे गोड वाटत नसे. मोकळे वाटत नसे; परंतु सगुणाबाईंना जावई फार आवडला.

'प्रेमा, सासरी नीट राहा. तुझे दैव थोर. नवरा कसा नक्षत्रासारखा आहे. त्याला मुठीत ठेव. नवऱ्याला मुठीत ठेवणे ही संसार सुखाचा करण्याची मुख्य किल्ली. हट्ट सोडून दे. लहानपणचे तुझे विचार सोडून दे. समजलीस ना. जप.'

प्रेमा काही बोलली नाही. तिची पाठवणी करून रामराव व सगुणाबाई परत शिवतरला गेली. एकदाचे लग्न झाले.





बेबी सरोजा : प्रकरण चौथे

## पित्याची शेवटची देणगी



प्रेमा सासरी गेली; परंतु सासऱ्याच्या परी बऱ्या दिसत नव्हत्या. प्रेमाच्या पतीचे नाव श्रीधर. श्रीधर चैनी होता. उधळ्या होता. श्रीमंत बापाचा बेटा होता. तो रोज सतरांदा कपडे बदली. मोटारीतून हिंडे. सुखोपभोगासाठी जणू त्याचा जन्म होता.

प्रेमाचे सारे दागिने श्रीधरने काढून घेतले. ते दागिने त्याने का काढून घेतले? त्याला का भांडवल म्हणून हवे होते? काय होती जरूरी?

श्रीधरचे एक प्रेमपात्र होते. एका मडमिणीवर त्याचे प्रेम होते. तो रात्रंदिवस त्या मडमिणीकडे पडलेला असे. मुलाची अब्रू राखावी म्हणून आईबापांनी त्याचे लग्न करून दिले. लग्न करून वाटेल ते चाळे केले तरी हरकत नाही असे जणू श्रीधरच्या प्रतिष्ठित पित्याचे मत होते.

प्रेमाचे दागिने त्या मडमिणीकडे जात होते. तिच्या साऱ्या चैनी पुरविण्यासाठी त्या दागिन्यांचा उपयोग केला जात होता. श्रीधर कधी रिक्त हस्ताने आला, तर ती मडमीण त्याला खेटरे मारी, हाकलून लावी.

प्रेमाच्या लक्षात सारा प्रकार आला. काय करावे ते तिला समजेना. तिचे धैर्य आज कोठे गेले? परंतु ती बांधलेली होती. हिंदू कायद्याने बांधलेली होती. ती कोठे गेली असती, तर तिच्या मुसक्या बांधून कायद्याने तिला परत आणले असते.

ती पतीची कधी कानउघाडणी करी. त्याला दोन शब्द सांगे. परंतु तो थोडेच ऐकणार? पुढे पुढे तो दारू पिऊन येऊ लागला. प्रेमाला मारहाण करू लागला. दुर्दैवी प्रेमा.

प्रेमाच्या अंगावर आता एकही दागिना उरला नव्हता.

'तू माहेरी जा व काही घेऊन ये. बापाची एकुलती तर तू मुलगी. गडगंज इस्टेट असेल बापाजवळ. जा. माहेरी जा. नवीन दागदागिने घेऊन ये. अशीच आलीस तर लाथ मारून घालवीन. समजलीस?' एके दिवशी श्रीधर म्हणाला

'माझ्या घरी आता काही नाही. लग्नाच्या वेळेस बाबांनी शेत विकले. आता काय विकणार?'

'वाडा विका म्हणावे. उद्या ते मेले म्हणजे तेथे कोण आहे राहायला? ते मी काही एक ऐकणार नाही. माहेरी कधी जातेस बोल.'

'मी काय सांगू?'

'दोन दिवसांची मुदत देतो. काय ते ठरव.'

सासूही घरात छळी. गड्यासारखी तिला राबवी. जिच्यावर पतीचे प्रेम नाही, तिच्यावर इतर मंडळी तरी का लोभ करतील? प्रेमाची बाजू तेथे कोण घेणार? इतर नोकरचाकरही तिचा अपमान करीत.

एके दिवशी कपाळ दुखत होते म्हणून प्रेमा खोलीत जाऊन जरा पडली, तर सासूने गहजब केला. नाही नाही ते सुनेला ती बोलली. इतक्यात श्रीधरही आला. आईचे बोलणे ऐकून तोही खवळला. तो प्रेमाच्या अंगावर धावून गेला. त्याने तिला बकोटी धरून ओढीत आणले.

'कपाळ दुखते म्हणे. ह्या भिंतीवर आपटतो ये ते कपाळ, म्हणजे राहील. का देऊ डाग? खबरदार पुन्हा दिवसा निजलीस तर! रात्रीही बारा वाजेपर्यंत काम केले पाहिजे. पहाटे चारला उठले पाहिजे. तुला हंटर हवा, हंटर. चाबकाने फोडीन बघ. याद राख. माहेरी जा म्हटले, तर जात नाही. बापाची इस्टेट वाचवायला बघते; परंतु तुझी चामडी नाही वाचणार. चामडी लोळवीन. नाही तर बऱ्या बोलाने माहेरी जा. घेऊन ये दागिने. जाशील की नाही? बोल.'

असे म्हणून त्याने तिच्या भराभर थोबाडीत मारल्या.

'बोल, जाशील ना माहेरी?'

'होय. जाईन.'

'कधी जाशील?'

'तुम्ही सांगाल तेव्हा.'

'मी कधीचा सांगतो आहे. सांगतो आहे की नाही?'

'हो.'

'मग का नाही गेलीस? मारू?'

'उद्या जाईन.'

'उद्या नाही. आज जा. आज चालती हो.'

आणि त्याच दिवशी रात्री तिला तिकीट काढून देण्यात आले. बायकांच्या डब्यात ती एकटी बसली होती. गाडी सुटली. ती रडत होती. काय करावे तिला समजेना. परंतु मरावयाचे तर धैर्य नव्हते. पुरुषांबरोबर आपण अशा कशा अबला ठरतो असे तिच्या मनात एकदम आले. आपण अन्यायाला प्रतिकार का करू नये? आपण मान उंच का करू नये? तिची तिला लाज वाटत होती. आपण डॉक्टर होऊ, मिशनरी बायांप्रमाणे दवाखाना घालू, असे म्हणत असू; परंतु माझी काय ही दशा, असे मनात येऊन ती पुन्हा रडू लागली.

ती शिरूरला आली. ती उपाशी होती. तिकिटाहून अधिक पैसे तिच्याजवळ नव्हते. स्टेशनावरून आपल्या गावी ती पायी आली.

'कोण प्रेमा?' रामराव आश्चर्याने म्हणाले.

'होय, तुमची अभागी प्रेमा.' ती रडत म्हणाली.

'आणखी कोण आहे बरोबर?'

'मी एकटीच आल्ये.'

'का?'

'त्यांनी पाठविले, हाकलले म्हणून.'

सगुणाबाई बाहेर आल्या. प्रेमा घरात गेली. तिने सारी हकीगत सांगितली. आईबापांना वाईट वाटले; परंतु करणार काय?

'आई, मी सांगत होते लग्न नको म्हणून. आता केलीत मला गाय. तुम्हाला दुःख व मला दुःख.'

'प्रेमा, नशिबात असते ते का टळते? हेही दिवस जातील. तुझ्या पतीला शुद्ध येईल. तू आपले शील सोडू नकोस. तू सत्त्वाला जाग.'

'पुन्हा पुन्हा दागिन्यांसाठी ते मला माहेरी पाठवतील. नाही तर मारतील.'

'तुला देणार आहोत हो करून दागिने. ही माझी कुडी घेऊन जा. माझी गोठ घेऊन जा. माझ्या हातांत नसले तरी चालेल. मला आता थोडेच मिरवायचे आहे. उगी. रडू नको.'

काही दिवसांनी प्रेमा पुन्हा सासरी आली. तिची कुडी, गोठ, वगैरे पाहून श्रीधर आनंदला. त्याने ताबडतोब ते दागिने काढून घेतले. मध्यंतरी त्याची ती मडमीण कोठे गावाला गेली. श्रीधर आता घरातच असे. लहर लागली तर जरा गोड बोले.

काही महिने बरे गेले. परंतु त्याची प्रियकरीण आली परत. श्रीधर पुन्हा घरी फारसा येईनासा झाला. प्रेमाची कुतरओढ पुन्हा सुरू झाली. तिला आता काही दिवस गेले होते.

'माहेरी जा बाळंतपणाला. बाळलेणे करून घेऊन ये. तूही नवीन एखादा ठसठशीत दागिना आण. तुझा बाप कंजूष दिसतो. वाडा तर मोठा आहे म्हणतेस. विका ना म्हणावं वाडा.' सासू एके दिवशी म्हणाली.

बाळंतपणासाठी प्रेमाची माहेरी रवानगी झाली. आईजवळ नवीन होणारी आई आली. एके दिवशी प्रेमा प्रसूत झाली. तिला मुलगी झाली. तिचे नाव सरोजा ठेवण्यात आले. मुलगी खरेच सुंदर होती. हळुहळू हाताच्या मुठी करू लागली. रांगू लागली. बाळसे येऊ लागले. सरोजा. खरेच, ती सरोजाप्रमाणे, कमळाप्रमाणे, सुंदर टवटवीत दिसत होती.

'बेबी सरोजा.' आजी प्रेमाने म्हणे.

'नुसते सरोजा नाही वाटते म्हणायचे?' रामराव विचारीत.

'बेबी सरोजा असेच म्हणायचे.'

रामरावांनी प्रेमाला नवीन दागिने करून दिले. सुंदर पातळे घेऊन दिली. बेबी सरोजाला सारे बाळलेणे करून दिले.

'बाबा, इतके हे सारे कशाला?'



‘बेटा, ही शेवटची देणगी. आता तुझ्या पित्याजवळ काही शिल्लक नाही. हा वाडाही आता आपला नाही. मी कर्जबाजारी आहे. सावकारांनी फिर्यादी केल्या आहेत. सारे लिलावात निघेल. आम्हालाही परागंदा व्हावे लागेल. सनातनी बंधूंची इच्छा पूर्ण होईल. प्रेमा, आता दागिन्यांसाठी पुन्हा नको येऊ हो. तुझ्या पित्याजवळ आता काही नाही.’

‘बाबा, नुसती भेटायला आल्ये तर चालेल ना?’

‘नुसती भेटायला ये; परंतु आम्ही कोठे असू? रानावनात असू. तेथे ये. मला प्रेम सदैव देता येईल; परंतु पैसा कोठून आणू?’

बेबी सरोजाला घेऊन प्रेमा पुन्हा सासरी यायला निघाली. तिचे हृदय दुःखाने भरून आले होते.



बेबी सरोजा : प्रकरण पाचवे



# ना सासर, ना माहेर



प्रेमा सासरी गेली. इकडे सगुणाबाई आजारी पडल्या. रामराव शुश्रूषा करीत होते. अद्याप बहिष्कार होताच. महार वस्तीतील मंडळी चौकशीला येत.

'तू यात्रेला जाऊ म्हणत होतीस; परंतु आता देवाच्या महायात्रेस जाणार. माझ्या आधी तू जाणार. खरे ना?' रामराव म्हणाले.

'यात्रेला जायला पैसे हवेत. आता मरणाची यात्रा करू दे. पुरे झाले या जगातील सोहळे. प्रेमाला जपा. तिच्या नशिबी काय आहे देवाला ठाऊक?'

सगुणाबाई मरण पावल्या. त्या सुवासिनी होत्या. त्यांना आता लुगडे कोण नेसवणार? बांगड्या कोण भरणार? आणि कुंकू कोण लावणार? गावचा बहिष्कार होता. सगुणाबाईंना न्यायला कोण येणार?

रामराव महारवाड्यात गेले. त्यांनी सर्व वार्ता सांगितली. विठनाकाची बायको भागी आली. इतर महारमंडळी आली. भागीने सगुणाबाईंच्या कपाळी कुंकू लावले. महारबंधूंनी तिरडी उचलली. रामराव मडके धरून जात होते. कोणी भटजी नाही. कोणी नाही.

नदीकाठी एका दूरच्या बाजूस सरण रचण्यात आले. रामरावांनी अग्नी दिला. चिता जळत होती. रामराव गीता म्हणत होते. तेथून महारवाड्यातच गेले. तेच त्यांचे आप्तेष्ट झाले. तेच खरे भाऊ झाले.

रामरावांचा वाडा जप्त झाला. त्यांच्यावर फिर्यादी झाल्या. जे होते नव्हते त्याचा लिलाव झाला. रामराव भिकारी झाले. ते आता शिवतर सोडून जाण्याचा विचार करू लागले. एके दिवशी ते अकस्मात् नाहीसे झाले. कोठे गेले?

प्रेमा सासरी गेली, परंतु तिची कष्टदशा संपली नव्हती. सरोजा खेळकर मुलगी होती; परंतु सासू त्या लहान लेकराचाही छळ करी. श्रीधरने प्रेमाचे पुन्हा सारे लुबाडले. सरोजाचे बाळलेणेही मडमेच्या मजेसाठी गेले.

'नाही नाही म्हणतो, परंतु बाप दरवेळेस काहीतरी करून देतोच. खूप डबोले असले पाहिजे. दत्तक वगैरे घेणार आहे की काय? काय ग, काय बोलतात तुझे बाबा?' सासूने विचारले.

'बाबा काही बोलत नाहीत.'

'किती आहे घरी संपत्ती?'

'आता घरात काही नाही..'

'खोटे सांगतेस. माहेरी पाठवली म्हणजे पुन्हा घेऊन येशील. श्रीधरने सांगितले म्हणजे झकत जाशील.'

'आता नका कोठे पाठवू. येथे ठार मारा.'

'ठार मारून कसे चालेल? तू आमचे कोळ्याचे जाळे आहेस. कोळी जाळे टाकतो व मासा पकडतो. त्याप्रमाणे तुला टाकायचे व दागिना पकडायचा.' असे म्हणून सासू उठून गेली.

थंडीचे दिवस आले होते. सरोजाला काहीतरी गरम करावे असे प्रेमाला वाटत होते. एके दिवशी श्रीधर घरी आला होता.

'आपल्या सरोजाला गरम कापड आणा ना. मी शिवीन पेटी. भारी थंडी पडते. आणाल का?' तिने विचारले.

'मरो तुझी सरोजा. आधी पैसे दे मला, आहेत की नाहीत तुझ्याजवळ? बापाने दिलेले लपवून ठेवले असशील! नाहीतर माहेरी जा व घेऊन ये. सरोजाला कपडे पण घेऊन ये. जा उद्या माहेरी. समजलीस?'

'नेहमी नेहमी माहेरी कशी जाऊ? बाबानी सांगितले की, आता पुन्हा येऊ नकोस. घरात आता काही नाही. बाबा वैतागून कोठे गेले असतील. सावकारांनी सारे घेतले असेल. गावकऱ्यांनी छळले असेल. सनातनी मंडळींचा आमच्यावर बहिष्कार होता.'

'बहिष्कार? का?'

'आम्ही महारांना जागा दिली म्हणून.'

'तुम्ही का म्हारामांगांना घरात घेता? म्हणून तुझ्या बापाने इतक्या लांब आणून तुझे लग्न केले वाटते? धर्मभ्रष्टाची तू मुलगी. आमचेही घर बाटवलेस. तू चालती हो. माहेरी जाऊन काही घेऊन आलीस तर तुला घरात घेईन. नाहीतर बाबांना व आईला आता सांगतो की, ही सबगोलंकार करणाऱ्याची मुलगी आहे म्हणून.'

'महारांना जवळ घेणे का पाप? आणि मडमांना मिठ्या मारणे म्हणजे वाटते पुण्य?'

'तोंड सांभाळून बोल. थोबाड फोडीन. मडमांना मिठ्या मारीन आणि तुला लाथा मारीन. तू कोण बोलणार? पुन्हा ब्र तर काढ. आज चालती हो माहेरी. पैसे घेऊन ये. जावयाला दान दिले म्हणजे सर्व पाप जाते. बापाला सांग की, जावयाला दहा हजार रुपये देऊन प्रायश्चित्त घ्या. समजलीस? आज जा. तुझी सरोजा घेऊन जा. रिकाम्या हाताने येऊ नकोस.'

प्रेमा व सरोजा ह्यांना हाकून देण्यात आले. आगगाडीत मायलेकरे बसली होती. जवळ ना अंथरूण ना पांघरूण. आपला पदर सरोजावर तिने घातला होता. मांडीवर सरोजा होती. तिला थंडी लागू नये म्हणून माता जपत होती.

त्या बायकांच्या डब्यात एक मुसलमान बाई होती. तिने सरोजाच्या अंगावर घालायला चादर दिली. प्रेमाने कृतज्ञता प्रगट केली. तिला अत्यंत वाईट वाटत होते. बाबांकडून हजारो रुपये सासरी आणले. तरी शेवटी अशी स्थिती यावी का?

प्रेमा सरोजाला पोटाशी धरून शिवतर गावी आली. तो वाड्याला कुलूप.

'बाबा कोठे आहेत?' तिने एकाला विचारले.

'महारवाड्यात विचार. येथे ब्राह्मण राहतात. धर्मभ्रष्टांची वार्ता आम्हाला विचारू नको.'

प्रेमा रडत रडत महारवाड्यात आली. विठनाकाकडे आली. त्याने अंगणात बसायला घोंगडी घातली.

'कोठे आहे आई? कोठे गेले बाबा?' तिने विचारले.

'आई वारल्या आणि रामराव अकस्मात् कोठे नाहीसे झाले. तुमची आई गेल्यापासून ते महारवाड्यात राहात होते. आमच्या हिनेच तुमच्या आईला शेवटचे कुंकू लावले. सनातनी कोणी आले नाहीत आणि पुढे घरदार सारे लिलावात गेले. दुःखाने कोठे तरी रामराव गेले असावेत. प्रेमाताई, तुम्ही

सत्यनारायणाला जागा दिली नसतीत, तर असे हे झाले नसते. तुम्ही अधर्म केलात म्हणून हे वाईट दिवस आले.'

'विठू, पांडवांना वनवास भोगावा लागला. त्यांनी का पाप केले होते? सुख येवो वा दुःख येवो, जे आपल्याला सत्य वाटते, न्याय्य वाटते, ते करीत राहावे. शेवटी मनाचे समाधान हेच खरे फळ.'

'सरोजाला थोडे दूध पाजा. मी देतो आणून.' विठूने कोठून तरी दूध आणले. प्रेमाने ते मुलीला दिले. सरोजा तेथे झोपली. प्रेमा नदीवर स्नान करायला गेली. तिला राहून राहून आईची आठवण येत होती. बाबांची येत होती. तिच्या डोळ्यांतून गंगायमुना वाहात होत्या. माझ्यामुळे बाबांना वनवास. देऊ का मी जीव? तो तिकडे सोनडोह आहे. घेऊ का त्यात उडी? परंतु माझी सरोजा आहे. तिला कोण? प्रेमा पाण्यातून बाहेर आली. पुन्हा विठूकडे आली. ती आज विठूकडेच जेवली. भागीने भातभाजी केली होती.

'विठू, मला दहा रुपये गोळा करून द्या. मी कोठे तरी मुंबई-मद्रासकडे जाते. मी शिकेन, मुलीला वाढवीन. पुढे तुझे रुपये परत करीन. तुझ्याजवळ मागायला संकोच वाटतो. तुम्ही गरीब; परंतु तुम्हीच आता मला आधार.'

'येश्याची कालच पलटणीतून मनीऑर्डर आली आहे. पैसे तसेच आहेत. ते घ्या तुम्ही. आमचे होईल कसे तरी. तुम्ही शिका. सुखी व्हा.'

प्रेमा दहा रुपये घेऊन निघाली. बरोबर सरोजा होती. कोठे जाणार आता ती? सारे शून्य होते. कोठे शहरात ओळख ना देख. तिची एक आत्या आफ्रिकेत होती; परंतु किती तरी वर्षांत तिचा पत्ता नव्हता. कोठे जाणार?

ती दमली. वाटेत एका झाडाखाली बसली. मांडीवर सरोजा होती. सरोजा एकदम रडू लागली. ती तिला उगी करीत होती, परंतु सरोजाचे रडे थांबेना. एक वाटसरू खोकत जात होता. त्याने खिशातून खडीसाखरेचा एक खडा काढून दिला. सरोजा उगी राहिली. वाटसरू निघून गेला. तो का देव होता?

प्रेमा आशेने उठली. आता तिला माहेर नव्हते, सासर नव्हते. सासरी जाण्याची सोय नव्हती. ती तशी रिकाम्या हाताने गेली असती, तर श्रीधरने मारहाण करून पुन्हा तिला हाकलले असते. नको आता सासर. नको. नरकयातना भोगल्या तेवढ्या पुरेत असा विचार करीत ती जात होती.



बेबी सरोजा : प्रकरण सहावे

# मुलीचा त्याग

प्रेमा मुंबई शहरात आली; परंतु ती कोठे जाणार? कोणाकडे राहाणार? ती एकटी असती तर प्रश्न निराळा होता; परंतु सरोजा होती. सुंदर गोड मुलगी! कोणाजवळ ती द्यावी? कोण तिला वाढवील, पाळील, पोशील? तिला काही समजेना. रस्त्याने ती जात होती. तिने उसाच्या गंडेऱ्या वाटेत घेतल्या. सरोजाला चुंकायला तिने एक करवा दिला. सरोजा आनंदली. ती करवा चुंकू लागली.

हिंडत हिंडत प्रेमा राणीच्या बागेजवळ आली. ती आत शिरली. कितीतरी लोक तेथे हिरवळीवर बसले होते. कोणी झोपले होते. प्रेमाही सरोजाला जवळ घेऊन झोपली. बऱ्याच वेळाने ती जागी झाली. तो सरोजा कोठे होती? प्रेमा घाबरली. ती इकडे तिकडे पाहू लागली. सरोजा, सरोजा अशा हाका मारू लागली. सरोजा दिसेना.

तो तिकडे दूर सरोजा दिसली. रांगत रांगत ती दूर गेली होती. माता एकदम धावली. तिने मुलीला उचलून घेतले. 'कोठे चाललीस बेबी? आईजवळ राहायचे नाही वाटते? गरीब आई नकोशी झाली? कोठे ग जात होतीस? आजोबांना शोधायला? आजीला शोधायला? आजी कसे म्हणे, कशी हाक मारी? 'बेबी सरोजा.' खरे ना? हसली रे हसली. आजीची हाक आवडते वाटते? लबाड.' असे ती बोलत होती. तिने काहीतरी खायला घेतले. सायंकाळ आता होत आली. रात्री कोठे जायचे? ती हिंडत हिंडत पुन्हा स्टेशनवर आली. रात्रभर तेथेच बाकावर बसली.

आता पहाट झाली होती. बेबीला घेऊन ती निघाली. हिंडत हिंडत समुद्रकाठी आली. थंडी होती. अद्याप झुंजुमुंजू होते. तो तेथे वाळवंटात तिला कोण दिसले? कोणीतरी तेथे बसले होते. समोर समुद्र उचंबळत होता. तो मनुष्य ध्यानस्थ होता. तो का अनंताची उपासना करीत होता?

कोण होता तो मनुष्य? ते रामराव होते. प्रेमाचे वडील होते. सरोजा खांद्याशी झोपलेली होती. तिने सरोजाला अलगत त्या ध्यानस्थ पित्याजवळ ठेवून दिले. बेबी झोपलेली होती. प्रेमा दूर जाऊन उभी राहिली. काय होते ते पाहात होती.



ध्यानस्थ माणसाने डोळे उघडले, तो समोर ती सुंदर मूर्ती. समुद्राने का ते रत्न आणून दिले? ते मोती आणून दिले? ती बाललक्ष्मी का समुद्रातून बाहेर आली होती? परंतु रामरावांनी ओळखले. आपल्या प्रेमाची ही मुलगी असे त्यांनी ओळखले. मग प्रेमा कोठे आहे? ती ह्या समुद्रात शिरली की काय? हा विचार मनात येताच रामराव घाबरून उठले. बेबी सरोजाला जवळ घेऊन ते समुद्राकडे पाहात राहिले.

पित्याने सरोजाला उचललेले पाहून प्रेमाचा जीव खाली पडला. ती तेथून तडक निघून गेली. कोठे गेली? ती हिंडत हिंडत दादर माटुंगा भागाकडे गेली. तेथे तिने एक अनाथ हिंदू महिलाश्रम पाहिला. ती तेथे गेली. तिची विचारपूस करण्यात आली. तिला तेथे आश्रय मिळाला.

आणि रामराव कोठे गेले? ते कोठे राहात असत? मुंबईतील अस्पृश्यांची वस्ती ज्या भागात होती, त्या भागात ते राहात होते. त्यांच्या गावचे काही महार तेथे होते. त्यांच्या आधाराने ते तेथे राहिले. तेथे त्यांनी सेवा आरंभिली. ते रात्रीची शाळा चालवीत. प्रौढ अस्पृश्यबंधूंना शिकवीत. त्यांना वाचून दाखवीत. त्या ठिकाणी थोडी पडीत अशी जागा होती. रामरावांनी तेथे फुले लावली. ती पडीत जागा आता सुंदर झाली. कामगार तेथे रात्रीच्या वेळेस बसत. रामराव तेथील फुले विकीत. दोन दिडक्या मिळवीत. ते तेथे सर्वांना प्रिय झाले. तेथील मंडळी त्यांना रामाबोवा असे म्हणत.

कधी कधी मंडळी भजन करीत. रामाबोवा भजन सांगायचे. मंडळी रंगून जायची. पुढे पुढे तर कामावर जाणारी मंडळी कधी कधी आपली मुलेही रामरावांच्या स्वाधीन करीत. रामराव त्या मुलांना सांभाळीत.

रामराव पहाटे उठत. समुद्रावर फिरायला जात. फिरून आल्यावर ते फुलझाडांना पाणी घालीत. मग वर्तमानपत्रे वाचायला वाचनालयात जात. दुपारी जेवत. विश्रांती घेत. तिसऱ्या प्रहरी पुन्हा पाणी वगैरे घालीत. सायंकाळी फिरून येत. रात्री वर्ग घेत.

त्यांची एक लहानशी खोली होती. त्या खोलीत प्रेमाचा एक फोटो होता. त्या खोलीत ते बेबी सरोजाला घेऊन आले. आजूबाजूची माणसे चौकशी करू लागली.

'रामाबोवा, मूल कोठून आणलेत?'

'समुद्राने दिले. मी समुद्रकाठी बसलो होतो. डोळे मिटून बसलो होतो. डोळे उघडले, तो समोर ही मुलगी. गोरी गोमटी गोड मुलगी. देवाने दिली. मी बागेत फुले फुलवितो. देवाने ही कळी फुलवायला पाठविली. पाहा कशी हसते! तिचे नाव मी सरोजा ठेवले आहे. आवडते ना ग तुला हे नाव?'

ती मुलगी हसली. रामरावांच्या गळ्यात तिने चिमण्या हातांनी मिठी मारली.

रामरावांना आता हा मोठाच उद्योग झाला. सरोजाचे ते सारे करीत. तिच्यासाठी पाणी तापवीत. तिला न्हाऊ घालीत. तिला दूध पाजीत. पुढे तिचे त्यांनी उष्टावण केले. तिला त्यांनी लहानशी गरम बंडी केली. सरोजा आजोबांच्याजवळ वाढू लागली. त्यांच्या कुशीत निजू लागली. बागेतील फुले आणून तिच्या केसांत ते गुंफीत.

किती सुरेख दिसे मग बेबी सरोजा!

✦ ✦ ✦



बेबी सरोजा : प्रकरण सातवे

# सेवासदनात



प्रेमाला नर्स व्हायचे होते. आपण डॉक्टर व्हावे असे लहानपणी तिला वाटत असे. परंतु डॉक्टर नाही तर निदान नर्स तरी होता आले तर पाहावे असे तिने ठरविले. ती मराठी शिकलेली होती. इंग्रजी तिला येत नव्हते. तिने पुष्कळ वाचले होते; परंतु ते सारे मराठीत. ती हुशार होती. बहुश्रुत होती. लग्नापूर्वी रामरावांना ती वर्तमानपत्रे वाचून दाखवायची. विवेकानंद, रामतीर्थ ह्यांची पुस्तके वाचून दाखवायची; परंतु आता इंग्रजी शिकायला हवे होते.

ती तेथे महिलाश्रमात इंग्रजी शिकू लागली. लवकरच पुरेसे इंग्रजी तिचे झाले. तेथील सर्वांच्या संमतीने ती पुण्यास सेवासदनात नर्सिंगचा कोर्स घ्यायला गेली. तिची मोफत व्यवस्था करण्यात आली होती.

तेथे ती सर्वांची आवडती झाली. ती सर्वांच्या उपयोगी पडे. सर्वांचे काम करी. सेवासदन संस्था तिला फार आवडे. लहानपणी 'आमच्या आयुष्यातील आठवणी' हे रमाबाई रानडे ह्यांनी लिहिलेले पुस्तक प्रेमाने वाचले होते. ते तिला फार आवडायचे. सेवासदन म्हणजे रमाबाईंचीच संस्था. रमाबाईंच्या तेथील भव्य तैलचित्राला ती वंदन करी. एकदा एका वेळी सभेत तिने रमाबाईंच्या चरित्रावर भाषण केले. फार सुरेख ती बोलली. सर्वांनी वाहवा केली.

एकदा ती आपल्या काही मैत्रिणींबरोबर फिरायला गेली होती. वाटेत एकाएकी तिला घेरी आली. तिला एका टांग्यात घालून एक मैत्रीण परत आली. प्रेमा सावध झाली; परंतु कसला तरी धक्का तिला एकदम बसला होता. दोन दिवस ती पडून होती.

एके दिवशी ती आपल्या खोलीत रडत होती. तिच्या मैत्रिणी आल्या, तो प्रेमाच्या डोळ्यांत आपले पाणी.

'प्रेमा काय झाले?'

'जुन्या आठवणी येतात व वाईट वाटते.'

'चल, व्याख्यानाला येतेस ना? आरोग्यशास्त्रावर व्याख्यान आहे. चल.'

'तुम्ही जा. आज नाही मी येत.'

'अशी एकटी नको रडत बसू. ऊठ.' मैत्रिणींनी तिला बळेच नेले.

प्रेमाला सरोजाची आठवण येई. ते तिचे दुःख होते. कोठेही लहान मूल पाहिले, म्हणजे तिला सरोजा आठवे. आता सरोजा मोठी झाली असेल, बोलू लागली असेल असे तिच्या मनात येई. आई म्हणून ती कोणाला हाक मारील? बाबा म्हणून ती कोणाला हाक मारील? आईबाप हयात असून प्रेमाची मुलगी पोरकी झाली होती; परंतु आजोबा तिला वाढवीत असतील. आईबापांपेक्षाही आजोबाआजींचे अधिक प्रेम नातवंडांवर असते. असा विचार मनात येऊन ती समाधान मानी.

तिचा कोर्स संपला. ती पहिली आली परीक्षेत. मुंबईच्या एका प्रख्यात दवाखान्यात तिला नोकरी मिळाली. ती मुंबईस राहू लागली. सरोजा कोठे आढळेल का, म्हणून तिचे डोळे तहानलेले असत; परंतु तिला वेळ नसे. दवाखान्यात भरपूर काम असे; परंतु ज्या आठवड्यात रात्रपाळी असे त्या आठवड्यात ती दिवसा मोकळी असे. ती मग हिंडत राही.

एकदा तिने आठ दिवसांची रजाच घेतली आणि रोज पहाटे उठून ती त्या समुद्रतीरावर जाई; परंतु रामराव कधी आढळले नाहीत. आता कसे रामराव येणार? बेबी त्यांच्याजवळ असेल. पहाटे तिला कुशीत घेऊन अंथरुणात पडलेले असतील. 'मी वेडीच आहे. पहाटे कसे येणार आता बाबा फिरायला! परंतु कोठे भेटतील बाबा? कोठे दिसतील?'

प्रेमा दवाखान्यात मनापासून काम करी. सारे रोगी तिची वाट पाहात. ती गोड बोलून सारे करी. रोग्यांची जणू ती आई बने. हिडीस फिडीस करीत नसे. त्यांना धीर देई.

एकदा एक मोठी श्रीमंत बाई आजारी पडून हॉस्पिटलमध्ये आली. इतर नोकरचाकर, इतर दाया तिची अधिक काळजी घेत. तिच्या बिछान्यावर रोज

स्वच्छ चादर. तिला वाटेल ते ताबडतोब मिळे. तिच्या सेवेसाठी सर्वजण सिद्ध असत.

एकदा प्रेमा एका गरीब रोग्याची शुश्रूषा करीत होती. इतक्यात त्या श्रीमंत बाईने हाक मारली. 'येते हां' असे म्हणून प्रेमा पहिले काम पुरे करीत होती. त्या गरीब बाईचे अंग नीट पुसून, तिला नीट नेसवून तिच्या अंगावर पांघरूण घालून प्रेमा त्या श्रीमंत बाईकडे गेली.

ती श्रीमंत बाई तणतणत होती; परंतु प्रेमाने तिचा राग दूर केला. तिची समजूत घातली. 'सारे रोगीच, सर्वांचे नको का करायला ?' असे ती म्हणाली.

'ती गरीब बाई तुम्हाला काय देणार ?'

'तिने काही न दिले, तरी परमेश्वर देईल.'

'परमेश्वर काय देईल ?'

'आशीर्वाद देईल.'

'परमेश्वर आहे का तरी ?'

'तुम्हाला काय वाटते ?'

'मला वाटते, नाही.'

'का बरे असे वाटते ?'

'माझ्या भावाचा त्याने सत्यनाश केला म्हणून.'

'कोठे होता तुमचा भाऊ ?'

'तिकडे लांब शिवतर म्हणून एक गाव आहे तेथे होता. मी व माझे पती आम्ही दोघे पुष्कळ वर्षे तिकडे आफ्रिकेत होतो. आम्हाला मूलबाळ नव्हते. आम्ही दोघेच. भरपूर पैसा मिळविला; परंतु त्या पैशाचे करायचे काय समजेना. आमची सारी संपत्ती स्वकष्टार्जित होती. आम्ही मुंबईस परत आलो. एक मोठा बंगला घेतला. निरनिराळ्या धंद्यांत पैसे गुंतविले. शेअर घेतले. राहात होतो. पुढे तेही मरण पावले. मी एकटी राहिल्ये. भावाचा शोध केला. त्याला एक मुलगी होती. प्रेमा तिचे नाव. कितीतरी वर्षांपूर्वी त्याचे एक पत्र आफ्रिकेत आले होते. त्या वेळेस त्याला पैसे हवे होते. आम्हाला पाठविता आले नाहीत. त्या वेळेस आम्ही श्रीमंत नव्हतो; परंतु भावाने पुन्हा पत्र पाठविले नाही. आम्हीही नाही पाठविले; परंतु इकडे आल्यावर शोध केला, तो कोणाचा पत्ता नाही. भावाचे घरदार सारे गेले, जप्त झाले. त्याची बायको मेली. तिला

न्यायलासुद्धा कोणी आले नाही. सत्यनारायणासाठी महारांना जागा दिली म्हणून बहिष्कार पण घातला गेला. त्याच्या मुलीचे लग्न होऊ देत ना. कोठे तरी भावाने तिचे लग्न केले, तर तिचेही म्हणे सासरी हाल! भाऊ वैतागून गेला. ती त्याची मुलगीही म्हणे अशीच कोठे वणवण करीत आहे. काय झाले असेल त्या बिचारीचे देवाला माहीत. असा कसा हा देव! माझ्या भावाच्या हात धुवून पाठीस लागणारा देव.'

प्रेमाच्या डोळ्यांत पाणी आले.

'रडताशा तुम्ही?'

'गरीब स्त्रियांची दशा ऐकली की, मला फार वाईट वाटते. जाते मी.'

'बसा जरा. तुम्ही सर्वांचे खरेच किती मनापासून करता. तुम्हाला पैशाचा मोह नाही. रोगी गरीब असो, श्रीमंत असो. सर्वांचे तुम्ही करता. बसा.'

'बसून कसे चालेल? पुन्हा येईन.'

असे म्हणून प्रेमा गेली. आजाऱ्यांना औषधे देत, चौकशी करीत, टेंपरेचरे घेत ती गेली. प्रेमा आदर्श सेविका होती.





बेबी सरोजा : प्रकरण आठवे

# आत्याच्या घरी



दवाखान्यात त्या श्रीमंत बाईला प्रेमाशिवाय चैन पडत नसे. प्रेमाची पाळी नसली तरीही ती तिच्यासाठी येई आणि ती श्रीमंत बाई मग आफ्रिकेतील गोष्टी सांगे.

'एकदा की नाही, आम्ही मोटारीतून जात होतो. फार मोठा घाट होता. तेथून मोटार फार हळुहळू न्यावी लागत असे. आजुबाजूस किर्र, अगदी दाट जंगल. रात्रीची वेळ होती आणि सिंहाच्या गर्जना कानांवर आल्या. मला भीती वाटली. आला सिंह व त्याने उडी मारली तर? असे सारखे मनात येई. कशी गर्जना! अंगावर काटा उभा राही. शेवटी एकदाचे आम्ही घरी आलो. जणू मृत्यूच्या जबड्यातून बाहेर पडलो. नंतर दोन दिवस मी अंथरुणात पडून होत्ये. इतका त्या भीतीचा परिणाम झाला होता आणि एकदा त्यांच्यावर कोण कठीण प्रसंग! केवढा मोठा सर्प! समोर आपला फणा करून उभा. हे तेथे उभे व समोर साप उभा. यांना हलता येईना, पळता येईना. हातात साधन नाही. साप यांच्याकडे बघत होता; हे सापाकडे बघत होते. फणा डोलवीत होता; परंतु थोड्या वेळाने साप फण् करून निघून गेला आणि हे धाड्कन पडले. अजून हे आले का नाहीत म्हणून मी पाहायला गेल्ये. तो हे पडलेले. मी त्यांना घरी आणले. ते मग शुद्धीवर आले. मरणाच्या घरून जणू आले. मरणासमोर सारखे उभे होते. केवढा मनावर ताण. असे हे प्रसंग.'

'जाऊ दे मला.'

'तुम्हाला सारखे काम हवे.'

‘नको का करायला? मला आवडतेही. मी येथला पगारही घेते.’

‘मी बरी झाल्ये की, तुम्हाला माझ्याकडे नेईन. मी घरी एकटी. माझ्याकडे राहा माझी नर्स म्हणून. मला रोज उठून काहीतरी होतच असते. जवळ कोण तरी असले म्हणजे बरे. प्रेमाचे कोण आहे मला? तुमचा स्वभाव प्रेमळ आहे. माणुसकी आहे तुम्हाला. याल का माझ्या बंगल्यात राहायला? मी भरपूर पगार देईन. तुम्ही पैशाच्या भुकेलेल्या नाही हे मी समजते; परंतु पाहा विचार करून.’

‘बरे बघू.’ असे म्हणून प्रेमा निघून गेली. पुढे काही दिवसांनी ती श्रीमंत बाई आपल्या बंगल्यात परत गेली; परंतु प्रेमाला ती विसरली नाही. एकदा मोटार घेऊन प्रेमाला न्यायला ती आली. ‘चलाच माझ्याकडे. फराळाला तरी चला.’ असा आग्रह करू लागली.

‘सायंकाळी पाळी संपली म्हणजे येईन.’

‘सायंकाळी मी मोटार घेऊन येईन हां.’

सायंकाळ झाली. प्रेमाचे काम संपले. ती बाहेर दवाखान्याच्या बागेत उभी होती. ती मोटार आली. प्रेमा त्या मोटारीत बसली. त्या श्रीमंत बाईने प्रेमाचा हात हातात घेतला.

‘तुमची संगति असावी असे मला वाटते.’

‘परंतु नोकरी आहे ना.’

‘सोडा ती नोकरी. तुम्ही कोणीतरी माझ्या व्हा. व्हाल? मला कोणी नाही. त्या दवाखान्यातील नोकरीचा तुमचा करार नाही ना? झालें तर मग.’

‘बघू. विचार करू.’

बंगल्याजवळ मोटार आली. नोकर सामोरे आले. प्रेमा त्या बाईबरोबर वर गेली. केवढा थोरला दिवाणखाना! त्यात आफ्रिकेतील सुंदर सुंदर वस्तू होत्या. सिंह-वाघांची कातडी होती. झेब्र्यांची पट्टेदार कातडी होती. शहामृगांची सुंदर अंडी टांगलेली होती. जंगलांचे देखावे होते; हस्तिदंती सामान होते. प्रेमा पाहात होती.

‘बसा. या कोचावर बसा.’

प्रेमा बसली.

'माझ्या भावासाठी आफ्रिकेतून या सुंदर चिजा आणल्या होत्या. त्याचा मोठा वाडा होता. त्यात शोभल्या असत्या; परंतु नव्हता तो मला भेटायचा. मग तुम्ही येता का राहायला माझ्याकडे? द्या राजीनामा. चार दिशी महिना संपतो आहे.'

'मी विचार करीन.'

'कसला विचार? तुम्हीही एकट्या आहात. आणखी कोणाला थोडेच विचारायचे आहे? तुमचा मला आधार होईल. माझा देवाचा आधार गेला; परंतु माणसाचा तरी मिळू दे.'

नोकराने फळे आणली. गोड गोड द्राक्षे, अंगूर, केळी, संत्र्याच्या सोलीव फोडी, चिकू. रसाळ मेवा समोर होता.

'खा, घ्या.'

प्रेमाने थोडा फलाहार केला. कॉफी प्यायली. ती जायला निघाली.

'मग होणार ना तुम्ही माझ्या?'

'मी कळवीन.'

'तुमचे सामानच घेऊन येते माझ्याकडे. आणू तुमचे सामान? पाठवू मोटार?

'घाई नको.'

'माझ्या हृदयाचे दुःख तुम्हाला का समजत नाही? तुम्ही मोठ्या नर्स ना? माझे दुःख दूर करा. जर कोणी प्रेमाचे माणूस मला मिळाले नाही तर मी वेडी होईन. बंगल्यातून उडी घेईन.'

'येईन मी.'

'कधी?'

'एक तारखेपासून.'

'मला किती आनंद झाला आहे! या. माझ्या व्हा.'

प्रेमा गेली. तिने राजीनामा दिला. तिने सर्व हकीगत दवाखान्याच्या प्रमुखांस सांगितली. तिला निरोप देण्यात आला. ती रोग्यांना भेटली. रोग्यांना वाईट वाटले.

'आम्हाला भेटायला येत जा.' रोगी म्हणाले.

'तुम्ही बरे होऊन घरीं जाल.' ती म्हणाली.

ती आपल्या वसतिगृहात आली. तिचे सामान फारसे नव्हतेच. ती श्रीमंत बाई मोटार घेऊन आली होती. प्रेमा निघाली. बंगल्यात राहायला आली.

रात्रीची वेळ होती. आज एका पलंगावर प्रेमा झोपली होती. मऊमऊ गादी होती. मऊमऊ उशी होती. पांघरायला मूल्यवान शाल होती. मच्छरदाणी होती; परंतु प्रेमाला झोप येईना. तिच्या डोळ्यांतून सारखे पाणी येत होते. सरोजा कोठे असेल ? बाबा कोठे असतील ? मी पलंगावर पडल्ये आहे. सरोजा जमिनीवर असेल. फटकुरावर पडली असेल. तिला पांघरायला नसेल. तिच्या अंगात नसेल. गरम कापड आणा म्हणून मागे एकदा पतीला म्हटले असता 'मरो तुझी सरोजा' तो कसे म्हणाला, ते सारे तिला आठवले. ती त्या गादीवरून उठली. माझी मुलगी धुळीत पडलेली असता मला त्या गाद्यागिर्द्यांवर लोळण्याचा काय अधिकार ? ती गच्चीत गेली. तेथे एकटीच बसली. आकाशातील तारे तिच्याकडे पाहात होते. वारे तिचे अश्रू पुसू पाहात होते.

ती श्रीमंत बाई जागी झाली, तो अंथरुणावर प्रेमा नाही. कोठे आहे प्रेमा ? तिने सर्वत्र पाहिले. ती गच्चीत गेली. तो तेथे प्रेमा होती.

'येथे का अशा बसल्यात ? हे काय, रडत होता वाटते ?'

'आठवणी आल्या. चला खाली. तुम्ही कशाला वर आलात ?'

'तुम्ही आता माझ्या ना आहात ? म्हणून आल्ये.'

प्रेमा पुन्हा अंथरुणावर पडली. पहाटे उठून ती समुद्रावर गेली. बाबा दिसतात का, या आशेने गेली होती.

ती श्रीमंत बाई उठली. प्रेमाला काही तरी दुःख आहे हे तिच्या लक्षात आले. ती प्रेमाच्या पेटीजवळ गेली. तिने ती पेटी उघडली. त्यात पत्रे होती. रामरावांची पत्रे. एक फोटो होता. प्रेमाच्या लग्नाच्या वेळचा फोटो. ती बाई चमकली.

'हा माझा भाऊ रामराव. मग ही प्रेमा कोण ? तीच का काय ? होय. तीच. माझ्या भावाची मुलगी. ती ही प्रेमा !'

ती श्रीमंत बाई तेथे बसली होती, तो प्रेमा आली.

'प्रेमा, मी तुझी आत्या आहे, आत्या.'

'होय आत्या, तू माझी आत्या.'

प्रेमाने आत्याच्या गळ्याला मिठी मारली. तिला अश्रू आवरत ना.



'आत्या, तू दवाखान्यात आफ्रिकेतील गोष्टी सांगितल्यास, तेव्हाच मी ओळखले की तू माझी आत्या म्हणून. त्या वेळेस माझ्या डोळ्यांत पाणी आले होते.'

'तेव्हाच तू का नाही सांगितलेस? मला तुझ्याविषयी काहीतरी वाटे. तुझ्याकडे माझे आंतडे ओढ घेई. प्रेमा, भाऊ नाही भेटला परंतु त्याची मुलगी तरी भेटली. माझ्या पैशांची तू मालकीण हो. देवानेच जणू तुला माझ्याकडे पाठविले.'

'आत्या, देव आहे ना?'

'हो. देव आहे. तुझी माझी भेट घडवणारा कोणी तरी आहे. ये. बस जवळ. ये. खरेच तू माझी आहेस प्रेमा! आणि तुझ्या पतीचे काय झाले? कोठे आहे तो?'

'त्यांनी माझा त्याग केला आहे. त्यांना पैसे हवेत. मी नको.'

'मग आता आहेत भरपूर पैसे. बोलव त्यांना.'

'नको आत्या, या पैशांचा चांगला उपयोग करू. एखादी संस्था काढू. एखादा गरीब लोकांसाठी दवाखाना काढू. लहानपणी माझ्या मनात येई की डॉक्टर व्हावे. मिशनरींप्रमाणे कोठे दवाखाना घालावा. ती माझी इच्छा पूर्ण होईल.'

'तू का अशीच राहाणार?'

'आता सेवा हाच आनंद.'

'परंतु पती निवळेल. पती असून असे नये राहू. पैशाची अडचण आता नाही.'

'आत्या, त्यांना कितीही पैसे मिळाले तरी पुरे होणार नाहीत; कुबेराला ते भिकेस लावतील. त्यांना पश्चात्ताप होईल असे वाटत नाही.'

'प्रेमा, होतो हो माणसाला पश्चात्ताप. केव्हा तरी होतोच. मरताना तरी होतो.'

'आत्या, सध्या नको ती चर्चा. तू मला भेटलीस. बाबा कोठे गेले देवास माहीत! परंतु तू मला भेटलीस. तू मला थोपट. तुझ्या मांडीवर डोके ठेवू?'

प्रेमाने आत्याच्या मांडीवर डोके ठेवले. आत्या थोपटीत बसली. आत्याचे सुप्त मातृप्रेम जणू प्रगट झाले. प्रेमाची ती जणू आई बनली.





बेबी सरोजा : प्रकरण नववे

# आत्याचे निधन



प्रेमाला आता काही कमी नव्हते, पण समुद्रात असूनही ज्याप्रमाणे तहान भागवता येत नाही, त्याप्रमाणे वैभवात असूनही तिला समाधान नव्हते. आत्याजवळ ती बसे. वरवर हसे. सिनेमा नाटकाला जाई; परंतु मन विषण्णच असे.

आत्याने तिला मोत्यांचा कंठा आणला. मोठमोठ्या मोत्यांची कुडी आणली. नेसायला मोलवान रेशमी पातळे. प्रेमा आता राणीसारखी दिसे; परंतु राणीप्रमाणे असूनही ती केविलवाणी होती. आत्या जवळ नसली म्हणजे तिचे डोळे भरून आल्याशिवाय राहात नसत.

'प्रेमा, आपण यात्रेला जायचे ? येऊ निरनिराळी तीर्थे पाहून. निरनिराळी शहरे पाहून. येतेस ? तुलाही विरंगुळा होईल. माझेही दिवस सार्थकी लागतील.'

'आत्या, माझी आई बाबांना नेहमी म्हणायची की, यात्रेला चला. बाबा म्हणायचे, प्रेमाचे लग्न झाले म्हणजे जाऊ; परंतु आईची इच्छा पूर्ण झाली नाही. ती देवाकडे गेली.'

'आईची इच्छा आता तू पुरी कर.'

'आत्या, खरोखर माझे लक्ष कशात लागत नाही. तुला एक गोष्ट सांगू ? अद्याप तुझ्याजवळून ती गोष्ट मी लपवून ठेवली आहे. सांगू ? आत्या, मला एक मुलगी आहे. सोन्यासारखी मुलगी.'

'कोठे आहे ती ? मूलबाळ झाल्यावरसुद्धा का नवऱ्याने तुला हाकलून दिले.'

'मला वाटले होते की, माझे बाळ आमचे संबंध प्रेमाचे करील; परंतु नव्हते नशीब.'

'ती मुलगी कोठे आहे?'

'समुद्रकाठी एके दिवशी माझे बाळ मी तेथे वाळवंटात ठेवून दिले.'

'असे कसे केलेस? लाटांबरोबर गेले असेल. अरेरे, असे कसे केलेस?'

'आत्या, तेथे एक गृहस्थ होते. साधूसारखे दिसत होते. त्यांच्या चर्येवरून ते सज्जन व दयाळू दिसत होते. डोळे मिटून ते बसले होते. त्यांच्या समोर मी सरोजाला ठेवले व निघून आल्ये.'

'त्याने ती मुलगी उचलली?'

'हो. मी पाहिले आणि मग मी निघून गेल्ये. शिकल्ये. नर्स झाल्ये. दवाखान्यात राहिल्ये. तुझी माझी गाठ पडली; परंतु सरोजा मला कोठे भेटेल? सारखी तिची आठवण येते मला.'

'आपण जाहिरात देऊ.'

'परंतु सरोजा नेणाऱ्या त्या माणसाला कसे कळणार?'

'कळेल. हल्लीचे लोक वर्तमानपत्रे वाचतात. जाहिराती तरी वाचतात.'

'परंतु आत्या, जाहिरात दिली तर माझ्या पतीलाही कळेल. तोही माझ्या शोधात असेल. मी एकदम श्रीमंत झाल्ये आहे असे कळले तर तोही येईल. पुन्हा माझी सरोजा मग भिकारी होईल. इतक्यात जाहिरात नको.'

'आपण यात्रेलाच जाऊ चल. कोठेतरी प्रवास करून येऊ. तुला बरे वाटेल. पवित्र, सुंदर स्थळे पाहिली म्हणजे मनाला शांत वाटते.'

'उन्हाळा आला म्हणजे आपण जाऊ. महाबळेश्वरला किंवा माथेरानला जाऊ. चालेल?'

परंतु उन्हाळा येण्याच्या आधीच आत्या आजारी पडली. बरीच आजारी पडली. तिला उठवेना.

'आत्या, दवाखान्यात जायचे का?'

'नको. तू आहेस ना येथे. आणखी कशाला दवाखाना? तुझ्यासारखी शुश्रूषा कोण करील? डॉक्टर येतच आहेत. तुझ्याजवळ मरू दे. आता तू कोठे जाऊ नकोस माझ्याजवळून. मी एकटी असल्ये की, मला भीती वाटते.'

प्रेमा सारखी आत्याजवळ बसून असे. आत्याची सेवा ती मनापासून करीत असे. आत्याला गीता वाचून दाखवीत असे. गाणी, अभंग म्हणत असे. एके दिवशी एक अभंग म्हणून प्रेमा म्हणाली –

'हा बाबांचा आवडता अभंग हो आत्या.'

'होय. हा अभंग त्याला फार आवडे. मलाही आठवते. म्हण, पुन्हा एकदा म्हण.' प्रेमाने पुन्हा तो अभंग म्हटला :

'आतां तरी पुढें हाचि उपदेश
नका करूं नाश आयुष्याचा
सकलांच्या पाया माझे दंडवत
आपुलालें चित्त शुद्ध करा
हित तें करावे देवाचे चिंतन
करुनियां मन एकविध
तुका म्हणे हित होय तो व्यापार
करा, काय फार शिकवावें'

'प्रेमा, किती सुरेख अभंग.'

'होय आत्या. आपले चित्त शुद्ध करणे याहून अधिक महत्त्वाचे काय ?'

'प्रेमा, तू माझी गादी स्वच्छ करतेस, रोज माझे अंग स्वच्छ करतेस. माझे कपडे बदलतेस; परंतु माझे मन मलाच स्वच्छ करायला हवे. नाही का?'

'होय आत्या.'

'परंतु प्रेमा, तुझ्या संगतीत राहून माझे मनही शुद्ध झाले. दवाखान्यातील तुझी निरपेक्ष सेवा पाहून माझ्या मनावर परिणाम होई. श्रीमंतीचा गर्व कमी होई. हृदयाची श्रीमंती नसेल, तर पैशाची श्रीमंती म्हणजे स्वतःला व जगाला एक शापच आहे.'

'आत्या, पैसा काय किंवा काही काय, उपयोग करणाऱ्यावर सारे आहे. पाण्याने डासही होतात, फुलेही फुलतात. विस्तवाने स्वयंपाकही होतो, आगही लावता येते. पैशाने जगाचा दुवाही घेता येतो, जगाचे शिव्याशापही घेता येतात.'

'प्रेमा, या दुखण्यातून मी काही वाचणार नाही. ही सारी इस्टेट तुझ्या नावाने करून ठेवते. तुला सारी इस्टेट बक्षीस. सारे शेअर्स, पैसे, हा बंगला, सारे तुझ्या नावाने करून ठेवायला हवे. मी वकील बोलावले आहेत. ते येतील. तू योग्य तोच उपयोग करशील. संस्था काढ. काही कर. तुझी सरोजा सापडली तर तिला तू दे. तुझा पती पश्चात्ताप होऊन आला तर सारेच गोड होईल. मला आशा आहे की, तुझा पती तुला मिळेल. तुझी बेबी सरोजा तुला भेटेल.'

'आणि बाबा?'

'तो विरक्त होऊन गेला असेल. हिमालयात बसला असेल.'

'हिमालयात नाही जाणार. बाबाही भेटतील. आत्या, एक गोष्ट तुला सांगू?'

'कोणती बाळ?'

'ज्या गृहस्थांसमोर मी सरोजाला ठेवले ते बाबाच होते!'

'काय माझा रामराव? माझा भाऊ!'

आत्याने एकदम उठून विचारले.

'होय आत्या.'

'तू हे इतके दिवस का नाही सांगितलेस? माझ्या सहीची जाहिरात दिली असती. बहिणीला भेटायला भाऊ आला असता.'

'आत्या, मला भीती वाटत होती. बाबा फार करारी आहेत. त्यांनी तुम्हाला आफ्रिकेत परत पत्र पाठविले नाही. मलाही बाळंत होऊन सासरी जाताना म्हणाले, आता माहेरी पुन्हा येऊ नकोस आणि त्यांनी मला त्यानंतर पत्रही पाठविले नाही. आई वारल्याचेही कळविले नाही. असे आहेत बाबा. जाहिरात देऊनही ते न येते, तर तुला अधिक वाईट वाटले असते किंवा बाबांनी रागाने काही लिहिले असते तरी तुला वाईट वाटले असते. म्हणून मी बोलल्ये नाही; परंतु तुझ्या निरवानिरवीच्या गोष्टी चालल्या असताना तरी तुझ्यापासून काही लपवून ठेवू नये म्हणून मी आता हे सांगितले. आत्या, रागावू नको माझ्यावर.'

'नाही हो बाळ. तुझ्यावर कशी रागावू? सारे जग तुझ्यावर रागावले आहे. आणखी मी का रागावू? आणि आयुष्याच्या अखेरच्या क्षणी का रागावू? सर्वांना प्रेम देण्याची ही वेळ. खरे ना?'

आत्याने पुढे बक्षीसपत्र करून ठेवले. सारी संपत्ती तिने प्रेमाला दिली. प्रेमा लक्षाधीश झाली.

आत्या क्षीण होत चालली. खंगत चालली.

'प्रेमा, तुझी मांडी दे. मांडीवर घे माझे डोके.'

प्रेमाने मांडीवर आत्याचे डोके घेतले. डॉक्टर येऊन गेले. नोकरचाकर खिन्न होऊन बसले होते.

प्रेमा गीता म्हणत होती. गीता ऐकता ऐकता आत्याने राम म्हटला.



बेबी सरोजा : प्रकरण वहावे

## मुलीची आकस्मिक भेट

आत्या देवाघरी गेली. आत्या अकस्मात् भेटली. त्याप्रमाणे सर्वांची अकस्मात् भेट व्हायची आहे की काय? असा विचार प्रेमाच्या मनात येई. या विचाराने तिला आशा येई. उत्साह वाटे.

ती मोटारीतून मुंबईभर हिंडे. बाबा कोठेतरी दिसतील, भेटतील असे तिला वाटे; परंतु तिची आशा अद्याप पूर्ण झाली नव्हती.

कंटाळून ती मुंबई सोडून गेली. हिंदुस्थानभर प्रवास करून आली. मोठमोठ्या शहरांतून राहिली; परंतु कोठेही गेली तरी सरोजा तिच्या डोळ्यांसमोर असे. काशीला तर गंमतच झाली. घाटावर प्रेमा स्नानासाठी गेली होती. तो तिथे तिला एक मुलगी दिसली.

'सरोजा. माझी सरोजा.' प्रेमा म्हणाली आणि त्या मुलीचे नावही सरोजाच होते.

'माझीच ना ग तू? तुझ्याएवढीच ती असेल. सरोजा.' प्रेमा त्या मुलीला जवळ घेऊन म्हणाली.

त्या मुलीची आई जवळच होती. ती आली.

'ही तुमची सरोजा वाटते? मग माझी कोठे आहे? द्या. तुमची सरोजा जरा माझ्याजवळ द्या. ये ग सरोजा. तुझी वेणी घालत्ये. ये.' आणि खरेच प्रेमाने त्या अनोळखी सरोजाची वेणी घातली. तिला खाऊसाठी पाच रुपये दिले.

किती तरी दिवसांनी प्रेमा पुन्हा मुंबईस आली होती. माळ्याने बंगला सांभाळला होता.

एके दिवशी सायंकाळी एक लहान मुलगी फुलांचे हार, गजरे विकीत रस्त्यातून जात होती. फुलांची गाणी गात ती जात होती. गोड सुंदर मुलगी. तिचा गोड आवाज. हातांत फुलांचे गोड गजरे. फुलांच्या गोड माळा. सुंदर व प्रसन्न होते ते दृश्य!

प्रेमाने गॅलरीतून खाली पाहिले.

'ए मुली, वर ये.' तिने हाक मारली.

ती लहान मुलगी धावत वर आली.

'तुम्हाला पाहिजेत गजरे, हे हार?'

'हो. ये बस.'

'बसत नाही मी. मला लवकर जायचे आहे.'

'कोठे जायचे आहे?'

'बाबांकडे.'

'कोठे राहातात बाबा?'

'लांब तिकडे.'

'त्यांचे नाव काय?'

'मी बाबा म्हणते. इतर लोक रामाबुवा म्हणतात.'

'साधू आहेत वाटतं?'

'म्हणजे काय?'

'डोक्यावर जटा, गळ्यात माळा, अंगाला भस्म.'

'अय्या, असे नाहीत काही बाबा. ते साधे माणसासारखे आहेत.'

'तुला ते आवडतात?'

'हो.'

'तुला कोणत्या नावाने हाक मारतात?'

'बेबी सरोजा.'

'कोणत्या?'

'बेबी सरोजा.'

प्रेमाने तिला एकदम जवळ घेतले. तिचे मुके घेतले.

'सापडली. सापडली माझी सरोजा.'

'मी तुमची नाही. जाऊ दे मला.'

‘मी जाऊ देणार नाही. ये, तुझी वेणी घालते छान.’

तिने त्या सरोजाला धरले. सुवासिक तेल तिच्या केसांवर घातले. तिच्या दोन बाजूंच्या दोन सुंदर लांब वेण्या घातल्या. त्यांत फुले घातली. तिने त्या सरोजाचे तोंड नीट पुसले.

‘आता तुला कपडे हवेत?’

‘मला जाऊ दे.’

‘ही बघ लहानशी चुनाडी. काशीहून मी आणली. म्हटले, सरोजा कोठे तरी भेटेलच. नेस. का नेसवू? का तुला झंपर हवा? तसेसुद्धा मी ठेवले आहेत. का घेऊन येऊ नवीन कपडे? तू येथे थांब. मी घेऊन येते हां. थांब. तुला लाडू देते. खाऊ देते. तू खात बस. मी मोटार घेऊन जाते व पटकन कपडे घेऊन येते.’ प्रेमाने तिला खायला दिले.

‘सरोजा, जाऊ नको हो. तुला मग मोटारीत घालून मी घरी पोचवीन. तुझ्या बाबांनाच आपण घेऊन येऊ. आपण येथेच राहू, हा बंगला छान आहे, नाही?’

‘परंतु येथे फुलांची बाग नाही. मी रोज लहानशा झारीने पाणी घालते. बाबा घालतात. आम्ही गाणी म्हणतो. मजा. तेथे कितीतरी मुले खेळायला असतात. बाबा गोष्टी सांगतात. येथे तर तुम्ही एकट्या. मी नाही येथे राहाणार!’

‘परंतु मी येईपर्यंत तरी थांबशील ना?’

‘पण नवीन कपड्यात बाबा मला ओळखणार नाहीत. बाबा म्हणतील, ही माझी नव्हे बेबी सरोजा. मग?’

‘मग माझ्याकडे ये, माझ्याकडे राहा.’

‘येथे बाबा नसतील तर मला रडू येईल.’

‘तुझी आई कोठे आहे?’

‘बाबाच मला जेवायला वाढतात. मला निजवतात. मी जाते.’

‘थांब. नवीन कपडे घालून जा. मी पटकन येते.’

प्रेमा मोटारीत बसून गेली. ती सरोजा दिवाणखान्यात होती. नोकर होते; परंतु एकदम नजर चुकवून ती पळून गेली. कोठे गेली?

मोटार पों पों करीत आली. प्रेमा नवीन कपडे घेऊन आली. ती धावतच वर आली; परंतु सरोजा कोठे आहे?

'सरोजा!' तिने हाक मारली.

तिने वर गच्चीत पाहिले. कोठे नाही. सरोजा! सरोजा! ती हाका मारीत होती. तिने गॅलरीतून हाका मारल्या. लोकांनी वर पाहिले; परंतु सरोजा कोठे आहे?

'तुम्ही तिला अडवून का ठेवले नाही?' ती नोकरांस म्हणाली.

'लोकांच्या मुलीला आम्ही कसे अडवू?'

'अरे ती लोकांची नव्हती. ती माझी होती. माझी हरवलेली बेबी सरोजा. तीच ती. आता कोठे शोधू? जा. बघा इकडे तिकडे.'

मोटारीत कपडे घालून ती पुन्हा बाहेर पडली. कोठे सरोजा दिसते का ती पाहात होती; परंतु सरोजा दिसली नाही. प्रेमा घरी आली. पलंगावर ती रडत बसली; परंतु तिने अश्रू पुसले. सरोजा आहे एवढे तर कळले. आज दृष्टीसही पडली. देवाची दया. आज क्षणभर माझ्याकडे आली. थोड्या दिवसांनी कायमची येईल. बाबाही आहेत. तिची काळजी घेत आहेत. द्यावी का जाहिरात? तिच्या नावाने इस्टेट ठेवून वकिलांच्या मार्फत द्यावी का नोटीस? बाबा ते वाचतील. त्यांना पैसे मिळतील. बेबीला मग काही कमी पडणार नाही. करू का असे? का पती येईल? त्यालाही पत्ता लागेल? नवीन भानगडी उपस्थित होतील? काय करावे, तिला समजेना.





बेबी सरोजा : प्रकरण अकरावे

# पतीच्या मदतीस



प्रेमा दुःखाने दिवस काढीत होती. आशा-निराशांवर तिची हृदयनौका नाचत होती. अशा सुमारासच ती ३० सालची सत्याग्रहाची प्रचंड चळवळ सुरू होणार होती. महात्माजींची दांडी-यात्रा सुरू झाली होती. ती स्फूर्तिदायक महान् यात्रा पाहावयास प्रेमाही गेली.

ती परत आली; परंतु शांत गंभीर होऊन आली. या चळवळीत पडावे असे तिला वाटले. मुंबईत हजारो स्त्रियांच्या मिरवणुकी निघत होत्या. समुद्राचे बेकायदा पाणी आणीत होत्या. मुलींना शिक्षा होत होत्या. प्रेमालाही भारताचा लढा ओढू पाहात होता.

परंतु पैशाचे काय करावे? बंगला जप्त झाला तर? शेअर्स जप्त झाले तर? झाले तर झाले. स्वातंत्र्यापुढे या दिडक्यांची काय मातब्बरी? पै पैशांत ज्याचा जीव अडकला, त्याला महान् ध्येये कशी भेटणार?

सारे सरोजाच्या नावाने करून ठेवावे का? बाबा ट्रस्टी होतील. का ही संपत्ती खादीच्या कामास देऊ? काय करू?

प्रेमाचे काही ठरत नव्हते. इतक्यात एके दिवशी वर्तमानपत्रात तिने काहीतरी वाचले. तिने ती बातमी पुन्हा वाचली. तिचे डोके सुन्न झाले. ती विचार करीत अंथरुणावर पडली.

कसली होती ती बातमी?

तिच्या श्रीधरवर अफरातफरीच्या गुन्ह्याखाली, खोट्या सह्या वगैरे करून फसवण्याच्या गुन्ह्याखाली खटला भरण्यात आला होता. तो पोलिसांच्या ताब्यात होता.

'श्रीधर! काय त्याचा नि माझा आता संबंध? ज्याने मला ढोराप्रमाणे वागवले, त्याच्याशी काय माझे नाते? ज्याने माझी पै किंमत केली, त्याच्यासाठी मी काय म्हणून रडावे? परंतु श्रीधर कसाही असला तरी माझ्या सरोजाचा तो पिता आहे. सरोजाचे सुख त्याने मला दिले आहे. श्रीधरला वाचवले पाहिजे. कसाही असला तरी त्याचा माझा संबंध आहे. त्याच्या संकटकाळी धावून जाणे माझे काम आहे.'

मनात असा विचार करून ती आत्याच्या ओळखीच्या वकिलाकडे गेली. त्याच्याजवळ तिने बोलणे केले. जामिनावर सोडवून घेऊ नये असे ठरले; परंतु तुरुंगात त्याला घरचे जेवणखाण मिळेल अशी व्यवस्था करण्याचे ठरले. कपडेलत्ते, अंथरूणपांघरूण, वाचायला पुस्तके, वगैरे सारे त्याला मिळेल असे करण्याचे ठरले. वकील खटला चालवणार होते. श्रीधरला भेटणार होते.

प्रेमा रोज वकिलांकडे जाई व सारी हकीगत विचारी. श्रीधरची मन:स्थिती उदास होती. आईबापांनी त्याला हाकलून दिले होते. त्याचा आमचा काही संबंध नाही असे जाहीर केले होते. त्या मडमिणीनेच त्याचा गळा कापला होता. श्रीधरला फशी पाडून ती कोठे परागंदा झाली होती.

बिचारा श्रीधर!

त्याला आता कोणी नव्हते. सारे गतजीवन त्याच्या डोळ्यांसमोर उभे राही. तो रडेही; परंतु पुन्हा डोळे पुशी. अश्रूंची त्याला लाज वाटे.

वकील या साऱ्या हकीगती प्रेमाला सांगत. तिच्या मनात त्याच्याविषयी सहानुभूती उत्पन्न होई. एके दिवशी श्रीधरने वकिलांस विचारले,

'वकीलसाहेब, माझ्यासाठी कोण ही सारी खटपट करीत आहे? मी कोणावर कधी उपकार केला नाही. कोणावर खरे प्रेम केले नाही. कोणाला साहाय्य केले नाही. संकटकाळी माझ्यासाठी देवाने यावे, उभे राहावे, असे मी काय केले आहे?'

'तुमच्या आप्तेष्टांची पुण्याई असेल.'

'आप्तेष्टांनी मला हाकलून दिले आहे.'

'तुमची पत्नी असेल.'

'पत्नीला मी घालवून दिले आहे. ती देवता होती; परंतु मी कसाब तिला छळीत असे. होय. तिचीच पुण्याई मला तारीत असेल. असेल का पण ती

जगात? गरीब बिचारी! मडमिणीच्या रंगाला मी भुललो आणि जवळचे रत्न फेकून दिले. अरेरे!'

असे हे संवाद कानावर येऊन प्रेमाला आशा वाटे. आत्याचे म्हणणे खरे होईल का? का हे पतीचे स्मशानवैराग्य आहे? उद्या पुन्हा पैसे हाती आले म्हणजे शेण खायला जाणार नाहीत कशावरून? आपण फक्त कर्तव्य करावे. या खटल्यातून त्यांना वाचवावे. दूरच राहावे. विषाची पुन्हा परीक्षा नको.

खटला बरेच दिवस चालणार असे दिसत होते. प्रेमाला सत्याग्रहात आता जाता येत नव्हते. पतीची मुक्तता करणे हे पहिले कर्तव्य. सत्याग्रह पुढे थांबलाही. महात्माजी विलायतेत गेले. वाटोळ्या परिषदेसाठी गेले.

तथापि देशात अशांतताच होती. पुन्हा चळवळ सुरू होणार की काय? नवीन प्रतिगामी व्हाइसरॉय आले होते. नोकरशाही स्वातंत्र्याची चळवळ ठेचण्यासाठी तयार होती. ३० सालचा काँग्रेसचा विजय नोकरशाहीला शल्याप्रमाणे टोचत होता.

प्रेमा वर्तमानपत्रातून हे सारे वाची. ती आता अंगावर खादी घाली. बंगल्यात सर्वत्र खादी. पुन्हा चळवळ सुरू झाली तर तीत पडायचे असे ती ठरवीत होती.

३१ साल गेले. ३२ साल उजाडले; परंतु देशात पुन्हा आगडोंब उसळला. महात्माजी मुंबई बंदरात उतरले. ते येण्याच्या आधीच पंडित जवाहरलाल यांस अटक झाली होती. अब्दुल गफारखान यांस अटक झाली होती. महात्माजींनी लॉर्ड विलिंग्डन यांस दोन तारा केल्या. महात्माजी त्यांना भेटू इच्छित होते. बोलू इच्छित होते; परंतु त्या तारांना उत्तरही आले नाही. महात्माजींसही ४ जानेवारीस अटक झाली. देशभर पुन्हा लाठीमार सुरू झाले.

अद्याप श्रीधरच्या खटल्याचा निकाल लागला नव्हता. केव्हा लागणार निकाल? प्रेमा अधीर झाली. तो एके दिवशी सर्व देशाला हादरविणारी बातमी आली. हरिजनांसाठी महात्माजींचा येरवड्यास उपवास सुरू झाला. सारा देश गहिवरला.

आज हजारो वर्षे आम्ही हरिजनांस दूर ठेवले. कधी होणार हे पाप दूर? ब्रिटिश सरकारने अस्पृश्यांस हिंदू समाजापासून जणू कायमचे अलग करण्याचे

ठरविले. महात्माजी या गोष्टीला विरोध करण्यासाठी प्राण हाती घेऊन उभे राहिले.

हिंदू समाजा, कधी तुझे डोळे उघडणार? हिंदुस्थानात आज जी मुसलमानांची संख्या आहे ती हिंदुधर्मातील स्वधर्मीयांविषयीच्या अनुदारतेचे फळ आहे. ज्या जातींना आम्ही तुच्छ मानीत होतो अशा जातीच्या जाती मुसलमानी धर्मात गेल्या. ख्रिश्चन धर्म आल्यावर हजारो तिरस्कृत लोक ख्रिश्चन होऊ लागले. सनातन्यांनो! ही गळती कधी थांबणार?

प्रेमाला तिचे लहानपणचे विचार आठवले. लहानपणी आपण अस्पृश्यांसाठी काय काय करीत असू ते तिला आठवले. तो सत्यनारायण, तो बहिष्कार, ते आईचे मरण, सारे तिला आठवले. चार पाच कोटी लोक! केवढी शक्ती आपण फुकट दवडीत आहोत!

आपली इस्टेट अस्पृश्योद्धारास देऊन टाकावी असे तिला वाटू लागले; परंतु उपवासाचे काय होणार? महात्माजी वाचणार का?

उपवास सुटला. तडजोड झाली. देशभर आनंद झाला. प्रेमाने प्रभूची प्रार्थना केली आणि तिचा पतीही दोषमुक्त होऊन सुटला.

पतीला भेटावे का? पाहावे का? माझ्या सरोजाचा जन्मदाता पिता! जायचे का त्याला भेटायला? तिचे काही निश्चित होईना. पतीला भेटायचे तिला धैर्य झाले नाही. पतीची तिला खात्री वाटेना. ती दरिद्री असती तर जाऊन भेटली असती; परंतु ती आज श्रीमंत होती. त्या श्रीमंतीने पती पुन्हा पापपंकात बुडेल असे तिला वाटे.

परंतु आता ती श्रीमंती तिलाही भोगवेना. ती जमिनीवर निजे. एक वेळ साधे जेवी. प्रेमा जणू तपस्विनी झाली.





बेबी सरोजा : प्रकरण बारावे

# सत्याग्रहात



एके दिवशी प्रेमा समुद्रावर फिरायला गेली होती. तिची मोटार रस्त्यावर उभी होती. एका बाकावर ती बसली होती. बराच वेळ झाला. गर्दी कमी झाली.

तो प्रेमाला एकाएकी कोण दिसले? तिच्याकडे एक गृहस्थ टक लावून सारखे पाहात होता. कोण तो गृहस्थ? प्रेमा एकदम उठली. तसा तो गृहस्थ जवळ आला. प्रेमा जाऊ लागली. त्याने अडविले.

'प्रेमा, जाऊ नकोस.'

'मला तुमच्याजवळ बोलायचे नाही.'

'तुला बोललेच पाहिजे. मी तुला जाऊ देणार नाही.'

'मी पोलिसांस हाक मारीन.'

'मी तुझा पती आहे. पोलीस मला काहीएक करू शकणार नाहीत. तुझ्याच अब्रूचे धिंडवडे होतील. खाली बस.'

प्रेमा बाकावर बसली. श्रीधरही बसला. कोणी बोलेना.

'प्रेमा, माझ्या खटल्यात कोणी मदत केली?'

'मी केली.'

'कोठून आणलेस पैसे?'

'आणले कोठून तरी.'

'नवरा तुरुंगात पडल्यावर पैसे घेऊन आलीस, परंतु आधी येतीस तर मी तुरुंगात आलोही नसतो. तू इकडे चैन करीत आहेस आणि नवऱ्याला भीक



मागायला लावले आहेस. तू मोटारी उडवतेस. बंगल्यात राहातेस. सारे मला समजले आहे. तुझ्या बंगल्यात मी राहायला येणार.'

'आलेत तर मी जीव देईन.'

'दे जीव. बंगला तरी मला मिळेल.'

'तो बंगला माझा नाही. ती मोटार माझी नाही. ही इस्टेट माझ्या आत्याची. तिची माझी अकस्मात् गाठ पडली. मी अशीच वणवण करीत होते. मुलीचाही त्याग केला. एके दिवशी आत्या भेटली. तिने मला नेले. श्रीधर, मी चैन नाही करीत! मी दुःखी आहे. मी जमिनीवर निजते. एकदा खाते. अलंकार घालीत नाही. खादी वापरते. चरखा कातीत बसते.'

'तू माझ्याकडे आले पाहिजे. तुझी आत्या पैसे देईल. माझीही व्यवस्था होईल.'

'ते पैसे मडमिर्णीकडे जातील.'

'जाऊ देत. बऱ्या बोलाने येतेस की नाही माझ्याकडे?'

'जोपर्यंत तू चांगला वागशील अशी माझी खात्री नाही तोपर्यंत मी येणार नाही.'

'मी तुझ्यावर फिर्याद करतो. तू मला मुक्त केलेस, परंतु मी तुला अडकवतो, तुझ्यावर हुकूमनामा मिळवतो. कायदा तुझ्या झिंज्या ओढील व माझ्या खोलीत तुला घेऊन येईल. समजलीस? जातो मी.'

श्रीधर निघून गेला. प्रेमा तेथे त्या बाकावर बसली. ती रडू लागली. सत्याग्रहात आता उडी घ्यावीच असे तिने ठरविले. ती उठली. मोटारवाला वाट पाहात होता. ती घरी आली.

ती वकिलाकडे गेली. तिने तो बंगला, ती इस्टेट बेबी सरोजाच्या नावे केली. वर्तमानपत्रात तशी नोटीस देण्याविषयी वकिलास तिने सांगितले. बंगल्याची व्यवस्था माळ्यास सांगितली. सर्व तयारी झाली.

एके दिवशी एके ठिकाणी तिने भाषण केले. तिला अटक झाली. सहा महिन्यांची तिला शिक्षा झाली. प्रेमा तुरुंगात गेली. वर्तमानपत्रात ती बातमी आली. प्रेमाचा फोटोही आला होता.

वर्तमानपत्राचा तो अंक हातात घेऊन श्रीधर प्रेमाच्या बंगल्यावर आला. माळी म्हणाला, 'येथे कोणी राहात नाही. बंगला बंद आहे. बाई सत्याग्रहात गेल्या आहेत.'

'खरेच गेल्या?'

'खरेच. छापूनसुद्धा आले.'

श्रीधर निघून गेला. तो आता आज समुद्रावर जाऊन बसला. एकटाच बसला. किती तरी वेळ तो विचार करीत होता. का यावे प्रेमाने माझ्याकडे? माझ्याजवळ काय आहे? पावित्र्य नाही, पराक्रम नाही, पैसा नाही, प्रेम नाही. काय आहे मजजवळ? कायद्याने मला ताबा मिळाला तरी तिच्या मनावर मला ताबा मिळेल का? प्रेमाचा कायदा हाच खरा. बाह्य कायद्यांची बाह्य सत्ता. खरी सत्ता प्रेमाची आहे. मला प्रेमावर खरी मालकी मिळवायची असेल तर तिच्यावर मी प्रेम केले पाहिजे. करता येईल का प्रेम? निदान माणुसकीने राहाता येईल का? माझे छंद सुटतील का? का मीही तुरुंगात जावे? सत्याग्रही म्हणून जाऊ का? देशभक्तीच्या गंगेत जरा डुंबू का? मागील पाप त्याने नाही का धुतले जाणार? असे विचार तो करीत होता.

समोर समुद्र उचंबळत होता. फार गर्दी नाही आता. श्रीधरला तेथून उठावेसे वाटेना. अशाच विचारसिंधूत डुंबत राहावे असे त्याला वाटले.

सत्याग्रहात जाण्याचा निश्चय करून तोही उठला. मुंबईत कोणता तरी दिन साजरा व्हायचा होता. श्रीधरने त्यात भाग घेतला. त्याला शिक्षा झाली. विसापूरच्या तुरुंगात त्याची रवानगी झाली.

तुरुंगात शेकडो ठिकाणचे राजकीय कैदी होते. श्रीधर त्यांच्यात रमू लागला. नवीन नवीन पुस्तके वाचू लागला. चर्चा, प्रवचने ऐकू लागला. कविता, पोवाडे ऐकू लागला. त्याच्या जीवनाचे नवीनच दालन जणू उघडले. श्रीधरला आनंद वाटू लागला.

तुरुंगातून सुटल्यावर आपण प्रेमाचे पाय धरू, तिची क्षमा मागू; काही तरी समाजसेवा करू, असे मनात तो योजू लागला. दिवसेंदिवस तो विचारी दिसू लागला. त्याच्या चर्येवर मधून मधून मंगल आनंदही दिसे.

प्रेमाही त्या स्वातंत्र्यमंदिरात विचार करीत होती. 'आपण आपल्या हालअपेष्टांनी इंग्रजांचा हृदयपालट करायला निघालो; मग माझ्या पतीचा हृदयपालट व्हावा म्हणून मी का धडपडू नये ? ते नाहीच का सुधारणार ? त्यांना घरी घेऊन यावे. पुन्हा प्रयत्न करून पाहावा. त्या दिवशीच मी जरा नीट बोलल्ये असत्ये तर ? ज्या दिवशी श्रीधरची निर्दोष सुटका झाली, त्या दिवशी त्याला मोटारीत घालून घरी आणले असते तर ? तो क्षण होता. तो क्रान्तीचा क्षण होता. मी तो क्षण घालविला. राष्ट्राच्या काय किंवा व्यक्तीच्या जीवनात काय, क्रान्तीचे क्षण जेव्हा येतात, तेव्हाच त्यांचा उपयोग करून घेतला पाहिजे. ती वेळ गेली, तो क्षण गेला की, मागून काही उपयोग होत नाही आणि असा क्षण पुन्हा यायला कितीतरी काळ लागतो.'

प्रेमाने मनाशी काही तरी ठरविले. सुटल्यावर श्रीधरचा पत्ता काढून त्याला घरी आणण्याचे, पुन्हा संसार सुरू करण्याचे ठरविले.

श्रीधर व प्रेमा दूरदूरच्या तुरुंगात होती; परंतु मनाने एकमेकांच्या जवळ येत होती. श्रीधर तुरुंगात होता, हे प्रेमाला माहीतच नव्हते.

प्रेमाची शिक्षा संपली. ती मुंबईस आपल्या बंगल्यावर आली. वकिलाने श्रीधरही तुरुंगात असल्याचे सांगितले.

'तुरुंगात ?'

'हो !'

'कशासाठी ?'

'सत्याग्रहासाठी.'

'श्रीधर सत्याग्रहात गेला ?'

'हो. विसापूर जेलमध्ये आहे.'

'मी त्याला भेटायला जाईन आणि तो तुरुंगात असेपर्यंत मी बाहेर कशाला राहू ? फिरून करीन सत्याग्रह !' पतीसाठी काही सामान, पुस्तके, कपडे, वगैरे घेऊन प्रेमा विसापूरला आली. श्रीधरला भेटीची बातमी ऐकून आश्चर्य वाटले. तेथे ऑफिसमध्ये श्रीधर आला. प्रेमा बसलेली होती. दोघांचे डोळे भरून आले होते.

'प्रेमा, मला क्षमा कर.'

'श्रीधर, आपण सारे विसरून जाऊ. आपण आनंदाने राहू. तुरुंगाने आपणा दोघांस नवीन दृष्टी दिली. आपले घरचे स्वराज्य तरी सुखाचे होईल. इंग्रजांचा हृदयपालट होईल तेव्हा होईल. तुझा व माझा झाला. मी पुन्हा तुरुंगात जाईन. तू तुरुंगात असता मी आता बाहेर राहणार नाही. हे घे सामान. हे कपडे तू सुटशील तेव्हा घालण्यासाठी. हा चरखा घे. माझ्यासाठी सूत काढ. हा साबण. ही पुस्तके.'

'प्रेमा, सरोजा कोठे आहे ?'

'भेटेल. तीही भेटेल. कोठेतरी आहे खास. एकदा दृष्टीस पडली होती. काळजी नको करू. जुने दुःख उगाळू नको. नवीन भविष्याचे चिंतन कर. आशादायक, आनंददायक भविष्य हो.'

'तूसुद्धा आनंदी राहा. मला क्षमा कर.'

'श्रीधर, असे नको बोलू.'

'परंतु म्हण ना क्षमा असे.'

'क्षमा हो.'

श्रीधरच्या तोंडावर व प्रेमाच्या तोंडावर किती प्रसन्न हास्य होते तेव्हा.





बेबी सरोजा : प्रकरण तेरावे

# हरिजन-यात्रा



१९३३ साली वैयक्तिक सत्याग्रह सुरू झाला होता. प्रेमा त्यात पुन्हा सामील झाली आणि रामराव काय करीत होते? महात्माजींनी आपला प्रख्यात हरिजन-दौरा हिंदुस्थानभर सुरू केला होता. सनातनी मंडळींची गंजलेली हृदये उघडण्यासाठी महात्माजी हिंडत होते. दिव्य संदेश देत होते. बाहेरची दगडी मंदिरे कोण उघडणार? ते महान् कार्य महापुरुषाने उचलले.

रामरावांनाही स्फूर्ती आली. हरिजनांसाठीच त्यांना छळ सहन करावा लागला होता. महात्माजींनी आपल्या तपस्येने आता स्फूर्तिगंगा निर्माण केली होती. वातावरण अनुकूल होते. आपणही प्रचार करीत बाहेर पडावे असे रामरावांना वाटले. सरोजाला ते बरोबर घेणार होते. सरोजाचा आवाज गोड होता. सुंदर अभंग व पदे तिला त्यांनी शिकविली होती. हरिजन चळवळीवरही त्यांनी गाणी केली होती.

आपल्या मित्रांचा निरोप घेऊन रामराव खरेच बाहेर पडले. गावोगाव घुमू लागले. सरोजा दमली तर ते तिला खांद्यावर घेत. हिंदुस्थानातील गावे जवळ जवळ असतात. चार चार मैलांवर गाव आहेच.

रामरावांची वाणी प्रासादिक होती. ते रस्त्यात भजन करीत उभे राहात. सरोजा मधून गाणी म्हणे आणि रामराव तेथेच उभ्याने प्रवचन सुरू करीत.

एकदा एका गावात ते गेले होते. लहानसे गाव. त्या गावात त्या दिवशी कोणी तरी मेले होते. रामरावांनी त्यावर प्रवचन सुरू केले.

'बंधूंनो, मृत्यू सर्वांना समानता शिकवतो. हा राव की रंक मृत्यू बघत नाही. हा श्रेष्ठ की कनिष्ठ मृत्यू बघत नाही. ही मरणे म्हणजे देवाकडचे संदेश असतात. मरणे ही सावध करण्यासाठी येतात. एक दिवस मरायचे आहे सर्वांना. म्हणून प्रेमाने नांदा. कोणाला तुच्छ मानू नका. सारी देवाची लेकरे.'

'ईश्वरी अंश सर्वत्र आहे. हरिजन का वाईट आहेत? ते श्रमाने भाकर मिळवितात. जो श्रमाने भाकर मिळवितो तो सर्वांत पुण्यवान. हरिजनांमध्ये श्रद्धा आहे, भक्ती आहे, प्रामाणिकपणा आहे. त्यांना जवळ घ्या.'

'ऊस वाकडा असला तरी आतील रस गोड असतो. धनुष्य वाकडे असले तरी बाण सरळ जातो. चोखामेळा, तो थोर हरिजन साधू, त्याने अभंगात नाही का म्हटले :

ऊस डोंगा परि रस नोहे डोंगा। काय भुललासी वरलिया सोंगा॥

म्हण ग सरोजा तो अभंग.'

सरोजाने तो अभंग गोड आवाजात म्हटला. परिणाम विलक्षण झाला. शेवटी सरोजाने सर्वांना हात जोडून प्रार्थना केली, 'हरिजनांना जवळ घ्या. म्हणजे देव जवळ येईल. स्वातंत्र्य जवळ येईल!'

तिची ती उत्कट प्रार्थना ऐकून लोक सद्गदित झाले.

असा प्रचार चालला होता.

एका गावी मुक्काम असताना रामराव वर्तमानपत्रे वाचीत होते. तो, एका वर्तमानपत्रात त्यांनी एक जाहिरात वाचली. ते आश्चर्यचकित झाले.

'सरोजा, सरोजा.'

'काय बाबा?'

'अग तुला देवाने एकदम लक्षाधीश केले आहे. देव तुझ्यावर प्रसन्न झाला आहे. ही बघ जाहिरात. तुला नाही सारे समजणार. आता आपल्याला परत गेले पाहिजे.'

'आपण असे फिरतच राहू.'

'किती दिवस फिरशील अशी?'

'तुम्ही बरोबर असलेत म्हणजे नेहमी फिरेन.'

'आणि आईला नाही का भेटायचे?'

'मला एकदा भेटली होती आई. बाबा, ती खरेच का हो माझी आई? आणि माझे बाबा कोठे आहेत? तुम्ही आजोबा; परंतु मी आपली तुम्हालाच बाबा म्हणत्ये, माझी आई, माझे बाबा मला भेटतील?'

'आई तर भेटेल. मग पुढे पाहू.!'

रामराव व सरोजा परत मुंबईस आली. त्या वकिलाच्या पत्त्यावर उभयता गेली. रामरावांनी आपली सर्व हकीगत सांगितली. प्रेमाच्या लग्नाच्या वेळचा एक फोटो होता. त्यांच्याजवळ एक प्रत होती. प्रेमाचाही एक फोटो होता. त्यांनी सर्व फोटो दाखविले. होय, हीच सरोजा. हेच रामराव.

तो बंगला, ती इस्टेट सरोजाला मिळाली.

त्या बंगल्यात रामराव राहायला आले. माळ्याने बंगला उघडला. दिवाणखान्यात दोघे आली.

'हाच, हाच बंगला. येथेच आई होती. कोठे आहे आई? येथे माझी तिने वेणी घातलीन्. येथे खाऊ दिलान् तिने. कोठे आहे आई?'

'आई तुरुंगात आहे बाळ.'

'आणि माझे बाबा?'

'तेही तुरुंगात.'

'मग आपणही जाऊ तुरुंगात. सारी एकत्र राहू. येता? लहान लहान मुलेसुद्धा जातात. मी भिणार नाही.'

'सरोजा, लवकरच ते सुटतील आणि तू मला आता आजोबा हाक मारत जा, समजलीस?'

'होय आजोबा. न पाहिलेले माझे बाबा येणार म्हणून ना?'

'हो.'

एके दिवशी सरोजा व रामराव प्रेमाच्या भेटीस निघाली. तुरुंगात भेट झाली.

'प्रेमा, बरी आहेस ना?' रामरावांनी विचारले.

'तुमच्या आशीर्वादाने सारे गोड होत आहे. आत्याची हकीगत कळली ना?'

'वकिलांनी सांगितली. तू सुटलीस म्हणजे आणखी सांगशील. सरोजा, जा ना आईजवळ. प्रेमा, आई केव्हा येईल असे सारखे ही म्हणत असते.'

'ये, बेबी, ये.'

प्रेमाने सरोजाला जवळ ओढले. तिच्या केसांवरून हात फिरविला.

‘सरोजा, त्या दिवशी पळून का ग गेलीस?’

‘मला नाही कळत.’

‘पुन्हा नाही ना जाणार?’

‘परंतु आता आजोबा नि आपण सारीं एके ठिकाणीच राह्यचे. आई, बाबा ग कसे आहेत? ते कसे दिसतात? गोरे गोरे आहेत. हो ना?

‘कशावरून ग?’

‘मी गोरी आहे म्हणून.’

‘बाबा, तुम्ही जाऊन श्रीधरलाही भेटा. तोही आता लवकरच सुटेल. मीही सुटेन सारा आनंद होईल.’

‘आई, आम्ही गावोगाव हिंडत होतो. मी गाणी म्हणत असे. बाबा, नाही आजोबा, प्रवचन करीत. गंमत.’

‘म्हणूनच देव प्रसन्न झाला. लहान मुलांना देव लवकर भेटतो.’

‘ध्रुवाला भेटला. नाही का हो आजोबा?’

अशा गोष्टी चालल्या. शेवटी रामराव व सरोजा गेली. श्रीधरलाही भेटायला दोघे गेली. सरोजाकडे श्रीधर पाहात राहिला. ‘मरो तुझी सरोजा’ हे स्वतःचे शब्द त्याला आठवले. त्याचे डोळे भरून आले.

‘तुम्ही ना माझे बाबा? गोरे गोरे बाबा. रडू नका. तुम्ही सुटाल आता. आई सुटेल.’

‘होय हो. सुटू. आता मला ओळखशील ना?’

‘हो मी पाहिलेच नव्हते कधी तुम्हाला.’

रामराव व सरोजा मुंबईस आली. श्रीधरला मित्रांनी विचारले, ‘ती कुणाची मुलगी?’

‘माझी. ती माझी हो बेबी सरोजा.’ तो प्रेमाने म्हणाला.





बेबी सरोजा : प्रकरण चौदावे

# आनंदी आनंद गडे



सरोजाला घेऊन रामराव आपल्या जन्मग्रामी शिवतरला आले. ते हरिजनवस्तीत उतरले. गावातील वातावरण आता निवळले होते. महात्माजींच्या उपवासाने गावात क्रांती झाली होती.

रामराव आले आहेत असे कळताच पूर्वीची सनातनी मंडळी त्यांच्याकडे गेली. त्यांना त्यांनी गावात नेले. गावच्या मंदिरात त्यांनी प्रवचन केले. ते ऐकून लोकांना आनंद झाला. सरोजाने सुंदर अभंग व गाणी म्हटली. 'किती गोड गळा आणि दिसते तरी किती गोड!' असे बायका म्हणाल्या.

आणि सरोजाला ती लाखो रुपयांची इस्टेट मिळाल्याचेही समजले. लोकांना आश्चर्य वाटले. रामराव आज श्रीमंत होते. त्यांचा वाडा त्यांना परत द्यायला सावकार तयार होता. रामरावांनी पैसे दिले व वाडा घेतला. सरोजा व रामराव पुन्हा वाड्यात आली. हरिजन बंधू आले. त्यांनी वाडा झाडला. स्वच्छ केला. 'ह्या वाड्यात आपण धर्मार्थ दवाखाना घालू,' असे रामराव म्हणाले. 'प्रेमाची लहानपणची इच्छा पूर्ण होईल.'

गावकरी म्हणाले, 'तुम्ही अस्पृश्यांना जागा दिलीत ते देवाला आवडले. महात्माजींसारख्यांनी आज ते अंगावर घेतले. देवाचे काम करणाऱ्यावर आज ना उद्या लक्ष्मी प्रसन्न झाल्याशिवाय कशी राहील? आपल्याच भावांना जो दूर लोटतो, तो भाग्याला दूर लोटतो, स्वातंत्र्याला दूर लोटतो. आता आमचे डोळे उघडले. तुम्ही आमचे गुरू आणि महात्माजी तर जगद्गुरू.'

सरोजासह रामराव मुंबईस आले. श्रीधर व प्रेमा आता सुटून आली. आनंदी आनंद झाला. दुःखानंतरच्या सुखाला एक अपूर्व गोडी असते. श्रीधरला त्या जुन्या आठवणी येतात. परंतु प्रेमा एकदम म्हणते, 'नका हो जुने काढू.'

एकदा सर्व मंडळी पुन्हा शिवतरला आली. विठनाकाला दहा रुपयांचे शंभर रुपये प्रेमाने दिले. शिवतरच्या त्या वाड्यात धर्मार्थ दवाखाना आता सुरू झाला. त्या दवाखान्याला आत्याचे नाव दिले गेले. आपल्या बहिणीवर आपण कायमचा राग कसा केला याचे रामरावांना पुष्कळ वेळा वाईट वाटते; परंतु मनुष्य कितीही चांगला असला तरी तोही एखादे वेळेस चुकतो. घसरतो आणि यातच मौज आहे. या जगात गर्व कोणालाच नको. निर्दोष एक परमेश्वर आहे. आपण सारी धडपडणारी त्याची मुले!

आत्याच्या प्रेमळ आठवणी प्रेमा सांगते. आफ्रिकेतील सांगते.

'आपण जाऊ आफ्रिकेत वाघ, सिंह, हत्ती बघायला.' सरोजा म्हणते.

'आफ्रिकेत कशाला? सर्कशीत येथेच पाहू.' श्रीधर तिला जवळ घेऊन म्हणतो.



# साने गुरुजींच्या गोड गोष्टी : १ ते १०

## भाग पहिला : खरा मित्र

आवडती नावडती, तीन मडकी, न्याय देणारा गुराखी, गोसावी, सोन्याची साखळी आणि खरा मित्र अशा या सहा गोष्टी जिव्हाळा आणि ध्येयनिष्ठा निर्माण करतात.

## भाग दुसरा : घामाची फुले

या नऊ विविध गोष्टी म्हणजे मुलांना मेजवानीच! मनोरंजनाबरोबरच नीतिमूल्यांचे दर्शन घडविणाऱ्या या गोड गोष्टी प्रत्येकाच्या जीवनात ध्येय निर्माण करतील.

## भाग तिसरा : मनूबाबा

सिलास मार्नरची ही भावपूर्ण कथा. ज्यावेळेस जीवनाचा उपयोग एखाद्या ध्येयासाठी होऊ लागतो तेव्हाच जीवनाचा विकास होऊ लागतो. जीवनाला अर्थ प्राप्त होऊ लागतो.

## भाग चौथा : फुलाचा प्रयोग

कृष्णकमळीच्या फुलावर सोनेरी छटा उमटवून दाखविणाऱ्याला एक लाख रुपयांचे बक्षीस जाहीर केलेले होते. फुलाला मिळाले का ते? भावपूर्ण हृदयस्पर्शी कथा.

## भाग पाचवा : दुःखी

व्हिक्टर ह्यूगोच्या 'ला मिझरेबल' ची ही हृदयस्पर्शी कथा. वालजी चोर होता. एका साधूने त्याला आपली चूक सुधारण्याची एक संधी दिली आणि वालजीचा महात्मा झाला.

## भाग सहावा : सोराब नि रुस्तुम

वडील आणि मुलगा यांचे अनोळखी अवस्थेतील द्वंद्व आज जगात अजरामर झाले आहे. या पुस्तकातील इतर चार कथाही मनाचा वेध घेणाऱ्याच आहेत.

## भाग सातवा : बेबी सरोजा

जीवनात कितीही संकटे आली, आपत्त्या आल्या तरी सत्य सोडू नये, दलितांविषयी प्रेमभाव ठेवावा. परमेश्वरावर विश्वास ठेवावा. हे पटवून देणारी तामीळ भाषेतील हृदयस्पर्शी कथा.

## भाग आठवा : करुणा देवी

शिरीष करुणेला विसरला पण करुणेने कर्तव्याचा सुगंध दरवळत ठेवणारी आपली ज्योत सतत तेवत ठेवली आणि शिरीषच्या अंतरातील विझलेला दीप पुन्हा लावला.

## भाग नववा : यती कि पती

यती होण्यासाठी संसाराचा त्याग करण्याचा प्रयत्न विजयने केला; परंतु मुक्तीचा मार्ग आपल्या सारख्या भावनोत्कट वृत्तीच्या माणसाला अनुरूप नाही हे त्याला पटले.

## भाग दहावा : चित्रा नि चारू

चित्रा नि तिची मुसलमान मैत्रीण फातमा. मैत्रीच्या कर्तव्यापासून निर्माण झालेली चित्रा नि चारूची ही करुणरम्य कथा चित्राच्या वडिलांच्या प्रेमाचीही साक्ष पटविते.


# केशव भिकाजी ढवळे

श्रीसमर्थ सदन, पहिली भटवाडी, गिरगांव, मुंबई ४